# नवभारत

वर्ष ४ थें ]      एप्रिल १९५१      [ अंक



किंमत १ रुपया



राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

अनुक्रमणिका




नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)







महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई – ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

राज्य मराठी विकास संस्था, मुंबई ही महाराष्ट्र शासनाने स्थापन केलेली स्वायत्त संस्था आहे. मराठी भाषा विभागाच्या पत्राप्रमाणे (संदर्भ क्र. मसंस २०१६/प्र.क्र.११५/२०१६/भाषा-२, दि. ३ जानेवारी, २०१७) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे '**महाराष्ट्रातील मराठी संशोधन मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य योजना**' कार्यान्वित करण्यात आली असून या योजनेअंतर्गत महाराष्ट्रातील मराठी भाषा, साहित्य व संस्कृती वृद्धिंगत होण्यासाठी काम करणाऱ्या महाराष्ट्रातील मान्यताप्राप्त मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य करण्यात येते.

सदर प्रकल्पांतर्गत प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांना राज्य मराठी विकास संस्थेद्वारे नवभारत मासिकांचे ऑक्टोबर १९४७ ते सप्टेंबर २०१७ पर्यंतच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासाठी अर्थसाहाय्य करण्यात आले होते. याअंतर्गत सदर अंकांचे संगणकीकरण करण्यात आले असून **प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांनी हे अंक जतन केलेले असल्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.**

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

**स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.**

अनुक्रमणिका






## या अंकांतील जाहिराती












## लेखक-परिचय

[ या अंकांतील खालील लेखकांशिवाय बाकीच्या लेखकांचे लेख 'नवभारतां'त या वर्षीं यापूर्वीं आले असून त्या त्या वेळीं त्यांचा परिचय दिला आहे.—का. सं. ]

**श्री. किशोरलाल घ. मश्रूवाला** (वर्धा)— ' हरिजन 'चे संपादक; गांधीसेवासंघाचे माजी अध्यक्ष; ' बुद्ध अने महावीर ', ' गांधीविचारदोहन ', ' Practical Non-violence ' इत्यादि पुस्तकांचे कर्ते.

**श्री. स. रं. सुंठणकर**, बी. ए. एलूएल्. बी. ( बेळगांव )—' शिवाजीचें अवतारकार्य ', ' मार्क्सवाद '- ' हिंदी राष्ट्रवाद ', ' मराठी रंगभूमि आणि दत्तोपंत हल्याळकर ' ' Towards Freedom ' इत्यादि पुस्तकांचे कर्ते.

**श्री. श्रीपाद जोशी** ( पुणें )— उर्दू, हिंदी, गुजराती साहित्याचे अनुवादक. ' उर्दू के अदीब ' '-आणि माणसांचा मुडदा पडला ', ' वेडा ' इत्यादि पुस्तकांचे कर्ते.

**श्री. राजा मंगळवेढेकर** ( पंढरपूर )—समाजवादी पक्षाचे कार्यकर्ते. सानेगुरुजी-सेवापथकांतील एक सेवक.

**श्री. के. वि. गोडबोले** ( पुणें )— पूर्वींच्या फलटण संस्थानचे दिवाण; ' जातिनिर्मूलनसंस्थे 'चे निष्ठावंत कार्यवाह; ' महाराष्ट्र-शाकुन्तला '-(' शाकुन्तला 'च्या मराठी अनुवादा ) चे कर्ते.

**श्री. दुर्गा भागवत** एम्. ए. ( मुंबई )—समाजशास्त्र, मानववंशशास्त्र, डॉ. केतकर यांचें वाङ्मय, यांवर यांचा विशेष व्यासंग असून, त्यांनीं ' राजारामशास्त्री भागवत यांचें चरित्र ' – ' Romance in Pali Folklore ' इत्यादि पुस्तकें लिहिलीं आहेत.

**श्री. जगन्नाथ टंकसाळी**—मुधोळ येथील ' सरस्वती-मंदिर ' या राष्ट्रभाषाप्रचारसंस्थेचे चालक.

**श्री. ग. ह. खरे**—पुणें येथील ' भारत-इतिहास-संशोधन-मंडळ ' या संस्थेचे ' क्युरेटर '. यांचीं ' मूर्तिविज्ञान ', ' संशोधकाचा मित्र ', ' इतिहासकर्ते मराठे ' इत्यादि इतिहाससंशोधनविषयक लहानमोठीं प्रकाशित पुस्तकें तेहतीस असून याशिवाय यांचे इतिहाससंशोधनविषयक इंग्रजी-मराठी लेखहि प्रकाशित झाले आहेत.

**चवे**, एम्. ए.—अलाहाबाद येथील नभोवाणीकेंद्रांतील कार्यकर्ते. हिंदी व इतर भारतीय भाषा यांतील साहित्य, संस्कृति व तत्त्वज्ञान यांवर यांचा विशेष व्यासंग असून त्यासंबंधीं त्यांचे लेख मराठी व हिंदी नियतकालिकांतून येत असतात.










सुलभ राष्ट्रीय ग्रंथमालच्या विश्वस्तमंडळाचें मासिक

वर्ष चौथें

अंक सातवा

# नवभारत

एप्रिल

१९५१

संचालक : श्री. शंकरराव देव

संपादक-मंडळ

आचार्य शं. द. जावडेकर–आचार्य स. ज. भागवत – श्री. हरि कृष्ण मोहनी – प्रा. वि. म. बेडेकर

का. संपादक



वार्षिक रु. ९ सहामाही रु. ५ अंकास रु. १

हें मासिक र. ग. जोशी यांनीं सुलभ मुद्रणालय, २९१ शनिवार, पुणें २, येथें छापून सुलभ राष्ट्रीय ग्रंथमालेच्या विश्वस्तमंडळाकरितां तेथेंच प्रसिद्ध केलें.









# संपादकीय

या एप्रिलच्या अंकांत श्री. शंकरराव देव यांच्या ‘ गीता, टिळक आणि गांधी ’ या विषयावरील लेखमालेंतील तिसरा व शेवटचा लेखांक आला आहे. यापूर्वीचे त्यांचे दोन लेखांक अनुक्रमें फेब्रुवारी व मार्चच्या अंकांत आले आहेत. श्री. शंकरराव देव यांनीं गीतेच्या अनुषंगानें केलेली टिळक, अरविंद आणि गांधी या थोर विचारवंतांच्या दृष्टिकोनांची तुलनात्मक चर्चा ही केवळ तात्त्विक स्वरूपाची वेदांती घटपटादि खटपट नसून, तिचा आपल्या वैयक्तिक, सामाजिक व व्यावहारिक जीवनांतील समस्यांशीं प्रत्यक्ष संबंध आहे, हें वाचकांच्या लक्षांत येईलच. आजच्या सामाजिक विचारवंतां-पुढें जो अत्यंत जिव्हाळ्याचा प्रश्न—साध्यसाधन-विचार किंवा साधनांची शुचिता–तो या चर्चेचा मूलभूत मुद्दा आहे.—या साधनशुचितेच्या प्रश्ना-वरील चर्चेला जोराचा जाहीर प्रारंभ आचार्य स. ज. भागवत यांनीं १९४९ सालीं पुण्याच्या ‘वसंत-व्याख्यानमाले ’च्या व्यासपीठावरून ‘ अध्यात्म आणि समाजक्रान्ति ’ या विषयावरील आपल्या व्याख्यानानें केला. त्या व्याख्यानानंतर त्याच वर्षी पुन्हां त्यांनीं ह्याच विषयाच्या अनुषंगानें दादर येथें ‘ अमरहिंदमंडळा ’तर्फे झालेल्या आपल्या व्याख्यानांत, टिळक आणि गांधी यांच्या तात्त्विक भूमिकांची तुलना करून ‘ गांधीजींचें जीवनदर्शन टिळकांच्यापेक्षां अधिक प्रगत आहे ’ असें आपलें मत प्रतिपादिलें. आ. भागवतांचें हें मत आणि त्यावर प्रा. न. र. फाटक आणि श्री. ज. स. करंदीकर यांनीं प्रसंगवशात् प्रकट केलेले विचार यांच्या निमित्तानें या विषयाची चर्चा करणारा व थिऑसफीच्या भूमिकेवरून आपला सिद्धान्त प्रतिपादणारा श्री. वा. ल. चिपळुणकर यांचा ‘ साधनशुचिता ’ हा लेख ‘ नवभारता ’च्या ऑक्टोबर १९५० च्या अंकांत प्रसिद्ध झालेला वाचकांपुढें आलेला आहे. अशा या महत्त्वाच्या विषयावरील झालेल्या चर्चेच्या अनुषंगानें श्री. शंकरराव देव यांनीं आपलें मत आपल्या गेल्या तीन लेखांतून मांडलें आहे.

गीतेच्या अर्थाचें संशोधन, चिंतन आणि मनन करणारे लो. टिळक आणि म. गांधी यांची प्रत्येकाची एक विशिष्ट जीवनदृष्टि होती. या थो नेत्यांच्या जीवनदृष्टीनें प्रभावित झालेले कार्यकर्ते व विचारवंत निरनिराळ्या कार्यक्षेत्रांतून पसरलेले आहेत. म्हणूनच त्या जीवनदृष्टीमागील मूलगामी तात्त्विक बैठकीची तपासणी होणें आज अवश्य आहे. गीतेचा अर्थ काय आहे यापेक्षांहि या दोन जीवनदृष्टींचा तुलनात्मक परामर्श घेण्याची आज आवश्यकता आहे. असा परामर्श किंवा तपासणी होतांना जें विचारमंथन होईल, त्या योगानें तरुण पिढीला आपली तात्त्विक बैठक व जीवनदृष्टि बनविणें सुलभ जाईल. याच हेतूनें प्रेरित होऊन ह्या विषयावरील कांहीं व्यासंगी व विचारवंत लेखकांना या विषयासंबंधीं आपला दृष्टिकोन मांडण्यास ‘नवभारता’तर्फे विनंति केली आहे. ‘लोकमान्या’चे संपादक श्री. पां. वा. गाडगीळ व ‘ लोकसत्ते ’चे संपादक श्री. ह. रा. महाजनी यांनीं या विषयां-संबंधीं आपले विचार आपापल्या वृत्तपत्रांतून प्रकट केले आहेत. आमच्या त्या विनंतीला अनुसरून श्री. किशोरलाल मश्रूवाला यांनीं पाठविलेला लेख याच अंकांत छापला आहे. ( त्यांच्या या लेखाचा हिन्दी अनुवाद ‘ सर्वोदय ’-मासिकाच्या मार्चच्या अंकांत आला आहे. ) श्री. मश्रूवाला यांनीं ‘ आपणांस या चर्चेत रस वाटत नाहीं ’ असें जरी म्हटलें असलें, तरी त्यांनीं या विषयासंबंधीं आपल्या विशिष्ट शैलीनें प्रकट केलेल्या मूलगामी विचारांवरून, त्यांची या विषयासंबंधींची भूमिका रसज्ञाची, विधायक आणि जीवनाशीं सुसंबद्ध अशीच आहे, हें सुस्पष्ट आहे.—या विषया-वरील आ. जावडेकर यांचा लेख आम्ही मेच्या अंकांत देणार आहोंत.

राजकारण आणि पक्षांची इष्टानिष्टता हा विषय हल्लींच्या निरनिराळ्या देशांच्या राजकीय परिस्थितीच्या संदर्भात राजकीय विचारवंतांचें लक्ष वेधून घेत आहे. या विषयासंबंधीं श्री. बा. रं. सुंठणकर यांचा लेख ‘ नवभारता ’च्या फेब्रुवारी-( १९५१ ) च्या अंकांत आलेला वाचकांना आठवत असेलच. त्या लेखांत त्यांनीं या विषयाची ऐतिहासिक पार्श्वभूमि दिली असून, पक्षपद्धतीचे दिवस संपत आले आहेत, हा निष्कर्ष काढला आहे. याच विषयाचें विवेचन हिंदी परिस्थितीच्या संदर्भात रणारा प्रस्तुत अंकांतील आ० जावडेकरांचा लेख कांस विचारप्रवर्तक वाटेल.

—वि. म. बेडेकर





आचार्य शं. द. जावडेकर

# हिंदी राजकारण आणि राजकीय पक्ष

हिंदुस्थान स्वतंत्र होऊन चार वर्षें होतील. हें वर्ष पुरें होण्याच्या आंत बहुधा स्वतंत्र भारतांतील पहिल्या सार्वत्रिक निवडणुकी घडून येतील. यावेळीं हिंदी जनतेनें आपल्या देशांतील राजकारणाचा जितका अभ्यास करावा व विचार करावा, तितका थोडाच म्हणावा लागेल. हिंदुस्थानांत घटनापरिषदेनें बनविलेल्या राज्यघटनेनुसार लोकशाही राज्य निर्माण व्हावयाचें आहे. या लोकशाही राज्याचें स्वरूप कसें होणार आणि त्याचें भवितव्य काय होणार, हें अद्यापि अनिश्चितच आहे. हिंदुस्थानांतील पाकिस्तानचा भाग वगळला तरी, जो प्रदेश शिल्लक उरतो, तेवढ्या मोठ्या प्रदेशावर लोकशाही राज्य सुव्यवस्थितपणें चालूं लागणें, ही गोष्ट फार बिकट आहे. युरोपखंडांतील इंग्लंड, फ्रान्स, स्वित्झर्लंड वगैरे लोकशाही राष्ट्रें आमच्या देशांतील एकेका प्रांता-एवढींसुद्धां नाहींत. तीं सामान्यतः एकच भाषा बोलणारीं, एकाच धर्माचीं आणि संस्कृतिदृष्ट्या एकरूप बनलेल्या समाजांचीं आहेत. याच्या उलट, हिंदुस्थानांत अनेक धर्मांचे, अनेक भाषा बोलणारे आणि अनेक जातींचे लोक एकत्र नांदत आहेत. हें भरतखंड म्हणजे युरोपखंडायेवढें एक खंडच आहे. असें असून त्याचें एकराष्ट्रीय राज्य स्थापन करण्याचा आपण निर्धार केलेला आहे. या दृष्टीनें विचार केल्यास, आपलें कार्य किती बिकट आहे आणि त्याची तुलना युरोपांतील राजकारणाशीं करणें किती चुकीचें आहे, ह्याची कल्पना येऊं शकेल. पण, आपल्या राष्ट्रांतील बहुभाषी व बहुधर्मी लोक आणि आपल्या राष्ट्राचा खंडतुल्य विस्तार एवढी एकच आपल्या मार्गांतील अडचण नव्हे.

हिंदुस्थानांत राष्ट्रीय लोकशाही स्थापन करण्याचा व ती यशस्वी करण्याचा आपण जो प्रयोग सुरु करीत आहोंत, तो प्रयोग अशा एका जागतिक परिस्थितींत आपण करीत आहों कीं, ती परिस्थिति राष्ट्रीयत्व आणि लोकशाही या दोहोंच्याहि वाढीस व सुरक्षिततेस अत्यंत प्रतिकूल बनलेली आहे. एकोणिसाव्या शतकांतील युरोपखंडाची राजकीय परिस्थिति तेथील राष्ट्रीयत्वाच्या आणि लोकशाहीच्या विकासास अत्यंत अनुकूल अशी होती. या अनुकूल परिस्थितींत युरोपांतील निरनिराळ्या राष्ट्रांत राष्ट्रीय लोकशाही राज्यांचा बराच विकास झाला. पण विसाव्या शतकाच्या प्रारंभीं ही राजकीय परिस्थिति बदलूं लागली. जागतिक महायुद्धाचे वारे जोरानें वाहूं लागले आणि पहिलें महायुद्ध होऊन गेल्या-नंतर सर्व युरोप खंडांत कांहीं काळ सर्वत्र राष्ट्रीय स्वयंनिर्णय व लोकशाही राज्यें यांचा विजय झाल्याचा आभास निर्माण झाला तरी, दहा-पंधरा वर्षांत युरोप खंडांतील हीं सर्व राष्ट्रें हळूंहळूं लोकशाही झुगारून देणाऱ्या एकपक्षीय हुकूमशाहीच्या आहारीं जाऊं लागलीं. रशियांत कम्युनिस्टांनीं हुकूमशाही स्थापन केली आणि इटली, जर्मनी व स्पेन या देशांत फॅसिस्ट पद्धतीची हुकूमशाही निर्माण झाली. यांतून अखेरीस दुसरें महायुद्ध उद्भवलें आणि आज सर्व युरोपखंड बेचिराख होऊन पडलें आहे. पूर्वयुरोप रशियाच्या हुकूमशाहीच्या कक्षेंत गेलें असून पश्चिमयुरोपांत जीं दुर्बल राष्ट्रें लोकशाही राजवटीला चिकटून राहिलीं आहेत, त्यांच्यावर अमेरिकेची सावकारी पकड बसलेली आहे. अशा रीतीनें जें युरोपखंड पन्नास वर्षांपूर्वीं राष्ट्रीयत्व







आणि लोकशाही या दिशेनें झपाट्यानें प्रगति करीत असल्याचें दिसत होतें, त्या युरोपखंडांतच लोकशाही आणि राष्ट्रीयत्व या दोहोंचाहि उच्छेद होत असल्याचें दिसत आहे. अमेरिकेंतील लोकशाही राज्य सर्वस्वी भांडवलशाहीच्या अधीन झालें असून त्याच्या आर्थिक साम्राज्याची महत्त्वाकांक्षा जगाला तिसऱ्या महायुद्धाकडे लोटूं लागली आहे. याच्या उलट, रशियांतील कम्युनिझमचें अनुकरण करून चीनमध्यें एक कम्युनिस्ट राज्य अस्तित्वांत आलें असून, याच कम्युनिझमचा प्रचार आशियांतील नवीन स्वतंत्र होऊं लागलेल्या बहुतेक राष्ट्रांत जारीनें सुरू आहे. युरोपीय साम्राज्यांच्या दास्यांतून मुक्त होऊन नव्यानेंच आपलें स्वातंत्र्य उपभोगूं लागलेल्या आशियांतील राष्ट्रांतील जनता दारिद्य आणि बेकारी यांच्या आवर्तांत सांपडून, ती निवारणाच्या आशेनें, कम्युनिझमकडे ओढली जात आहे. या नव्या राष्ट्रीय राज्यांना आपली औद्योगिक प्रगति करण्यासाठीं जें भांडवल आज हवें आहे, तें देण्याचें सामर्थ्य एकट्या अमेरिकेवांचून कोणापाशींहि नाहीं. पण अमेरिकेच्या या भांडवलाबरोबर तेथील समाजवादविरोधी राजकारणहि येत असल्यामुळें आणि कोणत्या तरी स्वरूपांत समाजवादी आर्थिक घटना निर्माण केल्यावांचून आपल्या बेकारीचा व दारिद्याचा प्रश्न सुटूं शकणार नाहीं, अशी या नव्या राष्ट्रांना खात्री वाटत असल्यामुळें, त्या राष्ट्रांतील स्वतंत्र बुद्धीचे राजकीय नेते आपणांभोंवतीं अमेरिकन राजकारणाचे पाश लावून घेण्यास तयार नाहींत. यामुळें आशियांतील राष्ट्रांना अमेरिकेचें भांडवल घेऊन आपला आर्थिक उद्धार करण्याची आशा फारशी उरलेली नाहीं. मागसलेल्या राष्ट्रांत औद्योगिक उन्नति करण्यासाठीं लागणारें भांडवल आंतूनच जमवावयाचें तर आणि झपाट्यानें व नियोजित पद्धतीनें औद्योगिक प्रगति करावयाची तर, लोकशाहीपेक्षां कम्युनिस्टांची किंवा फॅसिस्टांची एकपक्षीय हुकूमशाही अधिक प्रभावी ठरण्याचा संभव आहे, असें अनेक लोक उघडपणें अथवा प्रकटपणें बोलत आहेत. हिंदुस्थानांतील राष्ट्रीयत्वाला व लोकशाहीला मारक अशा या शक्ती आपला प्रभाव हिंदी राजकारणावर पाडण्याचे सतत प्रयत्न करीत आहेत. कोणी भाषावार प्रांतरचनेचा प्रश्न मर्यादेबाहेर पुढें रेटून प्रत्येक भाषिक प्रांत हें स्वतंत्र राष्ट्र आहे व त्यासाठीं कोणत्याहि मार्गानें लढण्यास जनतेनें पुढें आलें पाहिजे, असा प्रचार करून भरतखंडाचें राष्ट्रीयत्व छिन्नभिन्न करूं पाहात आहेत. कोणी भरतखंडांतील राज्य हें हिंदुराज्य बनलें पाहिजे, असा दुराग्रह धरून धर्माधर्मांतील व जातीजातींतील द्वेषभावना चेतवीत आहेत. कोणी कम्युनिझमचा अत्याचारी प्रचार करून येथील लोकशाही खिळखिळी व दुर्बल करण्याचा प्रयत्न करीत आहेत, तर कोणी कम्युनिझमचा बागुलबुवा दाखवून एका राष्ट्रीय सभेच्या एकपक्षीय हुकूमशाहीचाच प्रचंड प्रचार करीत आहेत. राष्ट्रावर संकट आलें आहे, आपलें राष्ट्र नवें व दुर्बल आहे, जनता अज्ञानी व दरिद्री आहे आणि लोकांना लोकशाही राज्याची फारशी माहिती नाहीं इत्यादि अनेक कारणें पुढें करून अधिकारारूढ काँग्रेसपक्षाविरुद्ध कोणीही पक्षसंघटना करूं नये आणि काँग्रेसपक्षावर कोणीहि कठोर टीका करूं नये, असा प्रचार धूमधडाक्यानें चालूं आहे. पण त्याचबरोबर अधिकारारूढ काँग्रेसपक्ष अत्यंत भ्रष्ट झालेला आहे, त्याच्या राजकीय व आर्थिक धोरणांत कोणतीहि सुसंगति उरलेली नाहीं आणि स्वातंत्र्याच्या लढ्याच्या वेळचें स्वार्थत्यागाचें व तत्त्वनिष्ठेचें तेज त्याच्या अंगीं आज उरलेलें नाहीं, असाहि प्रचार या पक्षाचे हितचिंतक व नेते करीत असतात. अशी एकंदर परिस्थिति लोकशाही राज्ययंत्राच्या वाढीस प्रतिकूल असल्यामुळें, भारतीय राजकारणाचें भवितव्य काय होणार, हें निश्चयानें सांगणें आज फार कठिण झालें आहे.

### लोकशाही आणि तत्त्वनिष्ठ पक्ष

वरील प्रकारची आंतरराष्ट्रीय व राष्ट्रीय परिस्थिति लक्षांत घेऊनच आपल्या देशापुढें जे राजकीय प्रश्न उभे आहेत, त्यांचें उत्तर देण्याचा आपण प्रयत्न केला पाहिजे. राजकारणांतील कोणताहि सिद्धान्त अगदीं निरपवाद असा असूं शकत नाहीं. त्याचप्रमाणें कोणतीही राजकीय संस्था किंवा घटना घेतली तरी, तिला काळेंगोरें अंग असल्यावांचून राहात नाहीं. कोणतीही संस्था सर्वच परिस्थितींत हितावहच







होईल असें म्हणतां येत नाहीं. त्याचप्रमाणें कोणत्याहि संस्थेचे केवळ चांगलेच परिणाम नेहमीं होतील किंवा तिचे केवळ वाईटच परिणाम होतील, असेंहि म्हणतां येत नाहीं. प्रत्येक गोष्टीचा सापेक्ष दृष्टीनें व तारतम्यानेंच आपण निर्णय केला पाहिजे. तथापि, आपल्या देशाची आणि जगाची एकंदर परिस्थिति लक्षांत घेऊन, दीर्घ दृष्टीनें विचार करण्याचें आणि अशा दीर्घ दृष्टीनें विचार करून घेतलेल्या निर्णयांना चिकाटीनें, एकनिष्ठेनें आणि स्वार्थत्यागानें चिकटून राहण्याचें शिक्षण प्रत्येक विचारवंत नागरिकानें आपणांस लावून घेतलें पाहिजे आणि इतरांस लावण्याचा प्रयत्न केला पाहिजे. हिंदी राजकारणाच्या नेत्यांनीं हिंदुस्थानचें एकराष्ट्रीय राज्य बनवावयाचें आणि त्यांत लोकशाही राज्यपद्धति व संस्कृति यांची वाढ करावयाची, असा जो निर्णय घेतला, तो अशाच दूरदृष्टीनें आणि आपल्या व जगाच्या वर्तमान-कालीन व भूतकालीन परिस्थितीचा सांगोपांग विचार करूनच घेतलेला आहे. सुमारें ६०–६५ वर्षांपूर्वीं हिंदुस्थानांत राष्ट्रीयत्व आणि लोकशाही यांची संस्थापना करण्यासाठीं काँग्रेस या नांवाची एक राष्ट्रीय सभा स्थापन करण्यांत आली. या राष्ट्रीय सभेला वाढवून तिच्या मार्फत ब्रिटिश साम्राज्याशीं झगडा करून भरतखंडाला राजकीय स्वातंत्र्य प्राप्त करून घेण्याच्या कामीं या काळांत जितक्या थोर विभूती या राष्ट्रांत होऊन गेल्या, त्या सर्वांनीं आपलें सर्वस्व वेंचून भाग घेतलेला आहे. हिंदी जनतेला याच संस्थेनें नवें चैतन्य दिलेलें असून या संस्थेच्या नेतृत्वामुळेंच आपणांस स्वातंत्र्याचा लाभ झालेला आहे, आणि म्हणून तिनें शिकविलेलीं राष्ट्रीयत्व आणि लोकशाही हीं तत्त्वें आपण दूर लोटतां कामा नयेत, याची जाणीव हिंदी जनतेच्या अंतःकरणांत मुरलेली आहे. आपल्या राष्ट्रीय स्वातंत्र्यावर अथवा आपल्या लोकशाही हक्कांवर कोणींहि आक्रमण केल्यास त्या-विरुद्ध झगडणें, हें आपलें कर्तव्य आहे, याचीही जाणीव येथील जनतेला थोड्याफार अंशानें झालेली आहे. इतकेंच नव्हे तर, आपल्या हक्कांसाठीं व स्वातंत्र्यासाठीं झगडतांना आपण अत्याचाराचा अवलंब करूं नये आणि राजकीय हुकुमाचा किंवा कायद्यांचा भंग करण्याचा प्रसंग आला तरी अनत्याचारी वृत्तीनें तो करणें शक्य व इष्ट आहे, याचेंही शिक्षण येथील सामान्य जनतेला आणि सार्वजनिक कार्यकर्त्यांना किंवा राजकीय नेत्यांना मिळालेलें आहे. यामुळें एकंदर परिस्थिति कितीहि प्रतिकूल असली तरी, भरतखंडांतील राष्ट्रीयत्व आणि लोकशाही यांचीं पाळेंमुळें भारतीय जनतेच्या अंतःकरणांत अगदींच खोल गेलेलीं नाहींत, असें समजण्याचें कारण नाहीं. हिंदु धर्मांतील जातिभेद आणि बालविवाह या सारख्या शेंकडों किंवा हजारों वर्षें रूढ असलेल्या सामाजिक संस्था आज उखडून पडत आहेत. धार्मिक व तात्त्विक विचारांतहि हिंदुस्थानांत गेल्या शें–पाऊणशें वर्षांत फार मोठें स्थित्यंतर अथवा क्रांति घडून आली असून हें स्थित्यंतरहि लोकशाही आणि राष्ट्रीयत्व यांच्या पोषणास अनुकूल असेंच झालेलें आहे. स्त्रीस्वातंत्र्य आणि अस्पृश्यतानिवारण याबाबतींतहि हिंदुसमाजांत क्रांतिकारक बदल एकसारखा होत असून त्याचीहि दिशा लोकशाही संस्कृतीला पोषक अशीच आहे. हिंदु-मुसलमानांतील राजकीय झगड्यांतून निर्माण झालेलें धर्मवेडहि आतां शान्त होऊं लागलें असून त्या धर्मवेडाचा विझूं लागलेला अग्नि फुंकर घालून प्रज्वलित करण्याचे प्रयत्न कोणीं कितीहि केले तरी धर्मभेदाधिष्ठित राजकीय पक्षांचें वैर या देशांत आतां निर्माण होईल अशी भीति उरलेली नाहीं त्याचप्रमाणें हिंदूसमाजांतील जमीनदोस्त झालेले जातिभेदांचें प्रेत उकरून काढून त्याला राजकीय रणांगणावर नाचविण्याचे प्रयत्न कोणीं कितीहि केले तरी, त्यांत फारसें यश येऊं शकेल अशीहि भीति बाळगण्यास पुरेसा आधार दिसत नाहीं.

वरील सर्व परिस्थिति लक्षांत घेतल्यास हिंदुस्थानांत लोकशाही राष्ट्रीयत्व निर्माण करण्यास अनुकूल अशी बरीच सिद्धता गेल्या शें-पाऊणशें वर्षांत करण्यांत आलेली आहे, हें दिसून येईल. त्याचप्रमाणें या काळांत अज्ञानी व मागसलेल्या जनतेच्या साहाय्यानें हिंदी राष्ट्रसभेनें ब्रिटिश साम्राज्याशीं जो चिकाटीनें, शिस्तीनें आणि विवेकानें आपल्या स्वातंत्र्यासाठीं झगडा केला, त्यामुळेंच हिंदुस्थान स्वतंत्र होतांच एक घटना-परिषद् भरवून सर्व हिंदुस्थानची लोक-शाही राज्यघटना तयार होईपर्यंतच्या संधिकालांत








सर्वत्र शांतता टेवून व राष्ट्रविरोधी संस्थानिकांच्या पुंडाव्याचा पाडाव करून देशांत नवी लोकशाहि प्रस्थापित करण्यांत राष्ट्रसभेला यश संपादन करतां आलें. आजच्या जगांतील अस्थिर व अशान्त वातावरणांत आणि विशेषतः ब्रिटिश साम्राज्यसत्तेनें जातां जातां हिंदुस्थानचे दोन खंड पाडून धर्मकलहाचा अग्नि पेटण्यास अनुकूल वातावरण निर्माण केलें असतां, तो शांत करून या प्रचंड राष्ट्रांत लोकशाहीची नवी राज्यघटना स्थापण्यांत राष्ट्रसभेनें संपादन केलेलें हें यश सामान्य प्रतीचें नाहीं. आतां हा संधिकाल संपत आलेला असून नव्या राज्यघटनेप्रमाणें नवें लोकनियुक्त सरकार लवकरच अधिकारावर चढणार आहे. त्यासाठींच पुढील सार्वत्रिक निवडणुकी व्हावयाच्या आहेत. लोकशाहीराज्याच्या स्थापनेची इतकी पूर्वतयारी झाल्यानंतर आतां पुढील राजकारणाची सुरुवात होतांना ज्या अनेक महत्त्वाच्या प्रश्नांचा निर्णय हिंदुस्थानांतील राजकीय विचारवंतांना आणि हिंदी जनतेला घ्यावयाचा आहे, त्यांपैकीं हिंदुस्थानांत राजकीय पक्ष असावेत किंवा नसावेत, असावेत असें म्हटल्यास, ते किती असावेत किंवा किती असणें नैसर्गिक व इष्ट होईल आणि हे राजकीय पक्ष सामान्यतः कोणत्या तात्त्विक मतभेदावर उभारले जाणें इष्ट व आवश्यक आहे — या प्रश्नांचा केवळ आदर्शनिष्ठ परंतु अव्यवहार्य तात्त्विक दृष्टीनें विचार करून निर्णय न देतां व्यवहार आणि तात्त्विक दृष्टि या दोहोंचाही समन्वय साधून हा निर्णय आपण दिला पाहिजे. या प्रश्नांचा विचार करीत असतां राजकीय पक्षांची संघटना ही तत्त्वतःच अमान्य करणारे कांहीं विचारवंत आज पुढें येत आहेत. परंतु हिंदुस्थानासारख्या प्रचंड देशाचें राज्य चालविण्यास आणि या देशातील मध्यसरकार आणि अनेक प्रांतिक सरकारें या सर्वांच्या धोरणांत एक सुसंगति आणि शिस्त सतत चालू राहावी आणि प्रत्येक सरकाराचीं निरनिराळीं खातीं आणि निरनिराळ्या प्रांतांवर राज्य करणाऱ्या मंत्रिमंडळांचीं धोरणें परस्परांना मारक अथवा विघातक होऊं नयेत आणि देशांत अंदाधुंदी व बेबंदशाही माजू नये अशी जर इच्छा असेल तर, व्यवहारदृष्टीनें या देशांत निरनिराळे राजकीय पक्ष संघटित होऊन त्यांनीं आपलीं ध्येयें, धोरणें व कार्यक्रम लोकांपुढें ठेवावेत आणि त्यांपैकीं ज्या पक्षाला बहुसंख्य मतदारांचा पाठिंबा मिळेल, त्या पक्षानें अधिकारावर यावें, असा व्यवहार येथें सुरू करणें अपरिहार्यच आहे. कोणत्याहि प्रकारची पक्षसंघटना न करतां लोकशाहीचें राज्य चालविणें— निदान आमच्या परिस्थितींत तरी—कोणत्याही देशांत, व विशेषतः हिंदुस्थानसारख्या प्रचंड खंडतुल्य देशांत, अशक्य आहे. सामान्यतः जेव्हां आपल्या देशांतील कांहीं लोक, आपल्या देशांत राजकीय पक्ष अस्तित्वांत येण्याची आवश्यकता नाहीं किंवा तें फारसें इष्ट नाहीं, असें म्हणतांना ऐकूं येतें, तेव्हां त्यांच्या मनांत असेंच असल्याचें दिसून येतें कीं, आज जो अधिकारारूढ काँग्रेस पक्ष आहे त्याहून दुसरा कोणताही पक्ष यापुढें निर्माण करण्याची आवश्यकता नाहीं. पण असें मानणारे लोकसुद्धां, काँग्रेस पक्षांत आज माजलेली बेबंदशाही, निरनिराळ्या प्रश्नांवरील धोरणासंबंधींच्या मतभेदांचा गोंधळ आणि एकाच पक्षाच्या निरनिराळ्या प्रांतिक मंत्रिमंडळांच्या धोरणांत दिसून येणारी विसंगति यांचा त्वरित निरास करावा, हें मान्य करतात. म्हणजेच काँग्रेस हा एक एकविचारानें, एका निश्चित धोरणानें आणि निःसंदिग्ध कार्यक्रमानें बांधलेला शिस्तशीर पक्ष म्हणावा, असा त्यांचा अभिप्राय आहे. अशा एका तरी संघटित राजकीय पक्षाची आवश्यकता जर राज्य चालविण्याच्या दृष्टीनें सर्वांसच मान्य करावी लागते, तर आजच्या परिस्थितींत राजकीय पक्षसंघटना ही एक तत्त्वभ्रष्ट करणारी गोष्ट आहे, येवढें म्हणून काम भागणार नाहीं. तसेंच, जर आपल्या राष्ट्रांतील राज्य चालविण्यास अधिकारारूढ पक्षाला शिस्तीची संघटना करणें अवश्य आहे तर, या एकाच पक्षाची हुकूमशाही निर्माण होऊं नये यासाठीं त्याहून भिन्न अशा दुसऱ्या एका तरी पक्षाची आवश्यकता लोकशाहीच्या वाढीच्या दृष्टीनें आणि सामान्य नागरिकाच्या हक्करक्षणाच्या दृष्टीनें मान्य करणें भागच आहे. एकपक्षसत्तेखालीं लोकशाहीची वाढ होऊं शकत नाहीं, याचा अनुभव गेल्या पंचवीस-तीस वर्षांत कम्युनिस्ट आणि फॅसिस्ट यांनीं जे प्रयोग केले त्यांवरून आतां पूर्णपणें सिद्ध झाला आहे. परकीय देशांत आलेला हा










अनुभव क्षणभर बाजूस ठेवला आणि आपल्या देशांत गेलीं चार वर्षें एकाच काँग्रेस पक्षाच्या नेतृत्वाखालीं जो राज्यकारभार चालूं आहे त्याचा अनुभव लक्षांत घेतला, तरीही आपणांस हें कबूल करावें लागेल कीं, आपल्या देशांत जो अधिकारारूढपक्ष आहे त्याला सनदशीर व कायदेशीर पद्धतीनें विरोध करणारा दुसरा तुल्यबल राजकीय पक्ष अस्तित्वांत आल्याशिवाय या देशांत सुयंत्रित व सुव्यवस्थित राज्य कारभार चालणेंहि अशक्य होणार आहे. कारण आज जो पक्ष अधिकारारूढ आहे, त्याची पक्षसंघटना इतकी शिथिल व बेशिस्त बनलेली आहे कीं, त्या पक्षानें कोणतेही कायदे केले अथवा कोणतेंही धोरण स्वीकारलें तरी, त्या कायद्यांची व धोरणांची अंमलबजावणी अधिकारी वर्गाकडून व जनतेकडून करवून घेणेंहि या पक्षाला अशक्य होऊं लागलें आहे. या पक्षाच्या ध्येयांत व धोरणांतच अंतर्विरोध असल्याचें स्पष्ट दिसत आहे. तसेंच या अंतर्विरोधाचा व शिस्तीच्या शैथिल्याचा फायदा घेणारे संधिसाधू लोक या पक्षांत भराभर शिरत आहेत. अशा संधिसाधू सभासदांचा फायदा आपल्या स्वार्थासाठीं करून घेऊन अधिकारी वर्ग आपला स्वतःचा स्वार्थ साधीत आहे. देशांतील व्यापारी-कारखानदार-वर्ग आपल्या व्यवहारावर सरकारनें लादलेलीं बंधनें झुगारून देण्यासाठीं अधिकारारूढ पक्षाच्या संधिसाधूसभासदांचा आणि स्वार्थी अधिकाऱ्यांचा यथेच्छ उपयोग करून घेत आहे. यामुळें देशांत एक प्रकारची अंदाधुंदी आणि अराजक पसरत आहे. गुन्हेगारांना कायद्याची भीति आणि सरकारचा वचक नाहींसा झाला आहे. असंघटित जनता भांबावून गेली आहे. असें असलें तरी देशांतील अधिकारारूढ पक्षाच्या विरुद्ध उघड पक्षसंघटना करण्याचें धैर्य फार थोड्यांच्या अंगीं दिसून येत आहे. देशांतील बहुतेक प्रचारसाधनें अधिकारारूढ पक्षाच्या हातींच गेलेलीं असून खेड्यापाड्यांतील एकंदर वातावरण अधिकारारूढ पक्षास विरोध करणारी संघटना बनविण्यास प्रतिकूल बनलें आहे. यामुळें आगामी निवडणुकींत अधिकारारूढ काँग्रेस पक्ष प्रचंड बहुमतानें निवडून येईल असाच सर्वांचा, निदान आज तरी, समज आहे. पण हा समज असणारे लोक असेंही मान्य करतात कीं, आजचा पक्ष पुन्हां निवडून आला तरी त्याच्या हातून जनतेच्या जिव्हाळ्याचा कोणताही प्रश्न सुटण्याचा संभव दिसत नाहीं. लोकांची आर्थिक हलाखी आणि राजकीय गाऱ्हाणीं यांची एकसारखी वाढ होत आहे. कोणत्याही खात्याचा राज्यकारभार व्यवस्थितपणें चालूं नाहीं. गुन्ह्यांचें प्रमाण आटोक्यांत येत नाहीं. आणि लोकांचें मत राज्यकारभारावर प्रभाव पाडूं शकत नाहीं.

या सर्व परिस्थितीचा विचार केल्यास आज आपल्या देशांत काँग्रेसपक्षाला विरोधी असा एक तितकाच तुल्यबल व अखिल भारतीय महत्त्वाचा पक्ष निर्माण करण्यावांचून आपण देशांत स्थापन करीत असलेलें लोकशाही राज्य सुव्यवस्थितपणें चालणें अशक्य होणार आहे. आपल्या सुदैवानें असा दुसरा तत्त्वनिष्ठ राजकीय पक्ष साथी जयप्रकाशप्रभृति समाजवादी नेते गेलीं तीन वर्षें संघटित करण्याचा मनोभावें प्रयत्न करीत असून त्या पक्षाला अखिल भारतीय स्वरूप आजच प्राप्त झालेलें आहे. इतकेंच नाहीं तर, त्या पक्षानें आपल्यापुढें जें तात्त्विक ध्येय ठेविलें आहे, तें आजच्या आपल्या राजकीय, सामाजिक व आर्थिक समस्यांना तोंड देण्याच्या दृष्टीनें अत्यंत अनुरूप असें आहे. आपल्या समाजवादी ध्येयाची संस्थापना लोकशाही साधनांनींच करावयाची आणि आपल्या राष्ट्रानें गेल्या पन्नास-साठ वर्षांत ज्या राजकीय, सामाजिक व आर्थिक पुरोगामी शक्ती निर्माण झाल्या आहेत त्या शक्तींचा विकास होईल आणि त्याच्या मार्गे निर्माण होत असलेली राष्ट्रीय संस्कृतीची परंपरा अखंड राहील, असेंच दूरदर्शी धोरण त्या पक्षानें आंखून घेतलेलें आहे. समाजवाद हाच आजचा युगधर्म आहे, हें ओळखून आपल्या राष्ट्राची विशिष्ट संस्कृति व परंपरा ध्यानांत घेऊन तत्त्वनिष्ठेनें व स्वार्थत्यागानें आपल्या पक्षाची संघटना करण्याचें श्रेय आजच्या पिढींतील जर कोणा एका पक्षास द्यावयाचें असेल तर तें या पक्षासच द्यावें लागेल. अशा रीतीनें हा पक्ष जर आपला प्रभाव भारतीय राजकारणावर आणि येथील लोकशाही राज्यावर वाढत्या प्रमाणांत पाडूं लागला तर, केवळ त्या पक्षाचेंच नव्हे तर; आपल्या राष्ट्राचें व










येथें आपण निर्माण करीत असलेल्या लोकशाहीचें भवितव्य निश्चित उज्ज्वल होऊं शकेल.

समाजवादी पक्षाप्रमाणेंच आपल्या तत्त्वनिष्ठेसाठीं त्याग करण्यास व क्लेश भोगण्यास तयार असणारा दुसरा पक्ष म्हणजे कम्युनिस्ट पक्ष होय. या पक्षाचा त्याग आणि निर्धार हे मोठे आहेत. परंतु या पक्षानें हिंदी राजकारणांत आजपर्यंत प्रत्येक आणीबाणीच्या प्रसंगीं आपल्या धोरणासंबंधीं जे मूलभूत निर्णय घेतले ते राष्ट्राच्या प्रगतीस व हितास इतके विघातक ठरलेले आहेत कीं, या पक्षाला आपल्या देशांतील परिस्थितीचें यथायोग्य ज्ञान झालेलें आहे किंवा नाहीं याबद्दल शंकाच वाटावी. १९३० आणि १९४२ या सालीं सर्व हिंदी राष्ट्र ब्रिटिश साम्राज्य-सत्तेविरुद्ध निःशस्त्र लढा करण्यास उभें राहिलें होतें. अशा आणीबाणीच्या प्रसंगीं कम्युनिस्टांनीं राष्ट्राला आपल्या निर्णयानें दगा दिला. १९४२ सालीं तर रशियाच्या आज्ञेपुढें मान वांकवून या पक्षानें ब्रिटिशसाम्राज्यशाहीचे हात बळकट केले. त्यानंतर भारत स्वतंत्र झाल्यावर देशांत जें राष्ट्रीय सरकार स्थापन झालें, त्या सरकाराविरुद्ध दहशत-वादाचें धोरण स्वीकारून नवीन स्वतंत्र झालेल्या राष्ट्राला कमकुवत करून देशांत अंदाधुंदी माजेल अशा प्रकारचें धोरण अवलंबिलें. अशा रीतीनें प्रत्येक महत्त्वाच्या वेळीं हा पक्ष आपल्या धोरणांत राष्ट्र-विघातक दिशा स्वीकारीत आल्यामुळें, या पक्षाचे स्वार्थत्याग आणि चिकाटी हे गुण समाजाला विघातकच ठरलेले आहेत. तसेंच या पक्षाचें एकंदर राजकीय तत्त्वज्ञान लोकशाहीला मारक आणि एक-पक्षीय हुकूमशाहीला पोषक असें असल्यामुळें, राष्ट्रांत जोंपर्यंत लोकशाही राज्ययंत्र सुस्थिर आहे आणि लोकशाहीच्या व शांततेच्या मार्गानें सामाजिक व आर्थिक क्रांति करून समाजवादाची संस्थापना होण्याची शक्यता आहे, तोंपर्यंत या पक्षाला आपला प्रभाव येथील राजकारणावर पाडतां येईल, असा मुळींच संभव नाहीं. तसेंच, लोकशाही आणि राष्ट्रीयत्व यांच्या आधारावर समाजवादाची इमारत उभारण्याची ज्यांची मनीषा आहे, अशा कोणत्याहि विवेकी मनुष्याचा या पक्षाला पाठिंबा मिळणें शक्य नाहीं. या पक्षाचें अविवेकी आणि अतिरेकी अथवा अत्याचारी धोरण हें येथील परिस्थितींत अज्ञानी जनतेंतहि फैलावण्याचा संभव नाहीं. मात्र, ज्या ज्या वेळीं या देशांतील अधिकारारूढ पक्ष एकपक्षीय हुकूमशाही वृत्ति धारण करील अथवा शेतकरी-कामकरी जनतेच्या गाऱ्हाण्यांकडे व आर्थिक हलाखी-कडे दुर्लक्ष करून भांडवलशाही आर्थिक घटना सांवरून धरण्याचा प्रयत्न करील त्या त्या वेळीं या देशांतील अनेक वर्गांच्या सामाजिक व राजकीय जुलमानें पिळली गेलेली अज्ञानी सामान्य जनता या पक्षाच्या विचाराकडे आकर्षिली जाईल. एवढेंच या पक्षाचें खरें भांडवल आहे आणि हें भांडवल त्याला मिळत राहील असें अविवेकी व अज्ञानी धोरण येथील अधिकारारूढ पक्ष जोंपर्यंत अवलंबीत राहील, तोंपर्यंत या भांडवलाच्या आधारें आपल्या राजकारणाचा व्यापार थोड्याफार प्रमाणांत हिंदी कम्युनिस्टपक्ष करीतच राहील. या पक्षाचा हा राज-कीय व्यापार बंद पडावयाचा तर, आज अधिकारा-रूढ असलेला कॉंग्रेस अथवा राष्ट्रीय पक्ष आणि त्याला शांततेनें विरोध करूं पाहणारा समाजवादी पक्ष हे दोघे जितक्या त्वरेनें या देशांत लोकशाहीचें शुद्ध वातावरण निर्माण करतील आणि समाजाच्या व राष्ट्राच्या जीवनाला आवश्यक असणारी सामाजिक व आर्थिक क्रांति घडवून आणण्यास जितक्या त्वरेनें साहाय्य करतील, तितकें इष्ट आहे. कम्युनिझमचा आपल्या देशांत अंत व्हावयाचा तर, तो शांततेच्या मार्गानें समाजवादाची संस्थापना झाल्यानंतरच कायमचा होऊं शकेल. तोंपर्यंत राष्ट्रीय आणि समाज-वादी या दोन पक्षांप्रमाणें कम्युनिस्टपक्ष या देशांत राहणें—थोड्या-फार प्रमाणांत प्रकट अगर प्रच्छन्न स्वरूपांत राहणें—अपरिहार्य दिसतें.

## जमातवादी राजकारणाचे अवशेष

अशा प्रकारें आपल्या आजच्या राजकीय, सामाजिक व आर्थिक परिस्थितींतून निर्माण होणारे तत्त्वनिष्ठ असे तीनच राजकीय पक्ष अखिल भारतीय स्वरूपांत येथें निर्माण होऊं शकतात. अशी परिस्थिति असतां, या देशांत निरनिराळ्या प्रांतांत कमीअधिक प्रमाणात लहानमोठे इतर राजकीय पक्ष आज निर्माण झाले आहेत. त्यांचाहि विचार व्यवहार्य राजकारणाच्या दृष्टीनें करणें अवश्य आहे. पण तो








विचार करीत असतां आपल्या देशांत धर्मनिष्ठ व जातिनिष्ठ राजकारणाची जी एक अनिष्ट परंपरा निर्माण झाली आहे, तिचा विचार करणें अवश्य आहे.

हिंदुस्थानांत हिंदु आणि मुसलमान अशा दोन धर्मांच्या राज्यकर्त्यांचीं भांडणें बराच काळ चालत आलेलीं होतीं. या दोन धर्मांच्या व संस्कृतींच्या समाजांचे एकसंध आधुनिक राष्ट्र बनविण्यांत हिंदूंना व मुसलमानांना यश येण्यापूर्वीच ब्रिटिशांनीं त्या दोघांना आपलें गुलाम बनविलें. यानंतर राष्ट्रीय सभेनें या दोघांचें एक लोकशाही राष्ट्र निर्माण करण्याचें आधुनिक राजकारण एकोणिसाव्या शतकाच्या अखेरीस सुरू केलें. या आधुनिक राष्ट्रीय राजकारणाला शह देऊन आपली साम्राज्यसत्ता टिकवून धरण्यासाठीं ब्रिटिशांनीं या देशांत जमातवादी राजकारणाचें विष पेरून त्यांतून उगवलेल्या विषवृक्षाचें संरक्षण करण्यासाठीं मुसलमानांना विभक्त मतदारसंघ निर्माण करून दिले. त्याचप्रमाणें हिंदु समाजांतील शिक्षणांत मागसलेल्या जमातींना जमातवादाच्या पायावर राष्ट्रसभाविरोधी राजकारण लढविण्यास प्रोत्साहन दिलें. अशा रीतीनें हिंदी राजकारणांत जमातनिष्ठ राजकीय पक्ष अस्तित्वांत येऊं लागले. आणि हे जमातनिष्ठ राजकीय पक्ष अद्यापिहि आपला प्रभाव हिंदी राजकारणावर पाडीत असल्यामुळें हिंदुस्थानांत केवळ तत्त्वनिष्ठ राजकीय पक्ष अद्यापि अस्तित्वांत येत नाहींत. हिन्दुस्थानांतील एकंदर समाज जातिनिष्टा व धर्मनिष्ठा या भेदक वृत्तींनीं छिन्नभिन्न झालेला आहे. येथील सामान्य अशिक्षित जनतेला अद्यापि, एकाच जमातींत राजकीय तत्त्वनिष्ठेमुळें अनेक पक्ष होणें, हें स्वाभाविक व इष्ट आहे, याची जाणीव होत नाहीं. कोणत्याहि जातीचा किंवा धर्माचा मनुष्य राजकीय पक्षभेदांचा विचार करूं लागला म्हणजे आमच्या जातीच्या लोकांनीं अथवा आमच्या धर्माच्या लोकांनीं कोणत्या राजकीय पक्षांत जावें असा प्रश्न तो विचारूं लागतो. उदा०, मुसलमानांनीं कॉंग्रेस पक्षांत जावें, कीं समाजवादी पक्षांत जावें अशी चर्चा गंभीरपणानें आमच्या देशांत सुसंस्कृत व सुशिक्षित लोकहि जाहीरपणें करतात. जणूं काय सर्व मुसलमानांनीं एकाच राजकीय पक्षांत राहिलें पाहिजे! अशाच प्रकारची चर्चा मराठे करतील, जैन करतील, लिंगायत करतील किंवा महारहि करतील; पण प्रत्येक जमातींत राष्ट्रीय पक्ष, समाजवादी पक्ष व कम्युनिस्ट पक्ष या तीनहि पक्षांचीं राजकारणें कमीअधिक प्रमाणांत चालू राहणें, हेंच स्वाभाविक, इष्ट आणि प्रगतिकारक आहे, याची जाणीव फार थोड्या लोकांना असते व तसें आग्रहानें प्रतिपादन करणारे तर फारच थोडे! असा आग्रह धरणें म्हणजे स्वतःला हास्यास्पद करून घेणेंच होय, अशी परिस्थिति या देशांत दिसून येते. ही परिस्थिति कोणाहीं एका व्यक्तीनें अगर पक्षानें निर्माण केलेली नाहीं. हिंदु आणि मुसलमान धर्मांतील लोकांचीं शेंकडों वर्षें चाललेलीं राजकीय भांडणें, जातिभेदानें हजारों वर्षें हिंदु समाजांतील खालच्या जातींवर लादलेली गुलामगिरी, अनियंत्रित परकीय आणि परधर्मीय राज्यकर्त्यांच्या अंमलाखालीं कंठावें लागलेलें दीनवाणें जीवन आणि सामाजिक व आर्थिक जुलमांची चालू असलेली छळणूक अशा अनेक कारणांमुळें आमच्या समाजाची अशी विकृत मानसिक अवस्था झालेली आहे. ब्रिटिश राज्यकर्त्यांनीं या आमच्या परंपरागत मानसिक विकृतीचा पुरेपूर फायदा घेऊन आम्हांला जमातवादी राजकीय पक्ष उभारण्यास व जमातवादी राजकारणाचे राष्ट्रविघातक खेळ खेळण्यास प्रोत्साहन दिलें. आतां आपण स्वतंत्र वातावरणांत आलों असून लोकशाही राज्य चालविण्याचा आणि त्या लोकशाही राज्याच्या आश्रयानेंच सामाजिक व आर्थिक क्रांति घडविण्याचा प्रयत्न करीत आहोंत. अशा वेळीं अनेक कारणांनीं निर्माण झालेले जमातवादी राजकीय पक्ष सोडून देऊन आमच्या लोकांना म्हणजे आमच्या समाजांतील प्रत्येक जमातींत जन्मलेल्या लोकांना आपापल्या प्रवृत्त्यनुसार राष्ट्रीय, समाजवादी किंवा कम्युनिस्ट या तिन्हींपैकीं कोणत्या तरी एका अखिल भारतीय राजकीय पक्षांत सामील व्हावें लागेल. ज्या वेळीं आमच्या समाजांतील प्रत्येक जमातींत असे तत्त्वनिष्ठ राजकीय पक्ष निर्माण होतील आणि त्या तत्त्वनिष्ठ राजकीय पक्षांत विभागून गेल्यामुळें प्रत्येक जमातीची फळी दुभंगून अथवा तिभंगून जाईल, तेव्हांच








आमच्या देशांत खरे तत्त्वनिष्ठ राजकीय पक्ष अस्तित्वांत येतील आणि लोकशाही राष्ट्रीयत्वाला आणि सामाजिक व आर्थिक क्रांतीला अनुकूल व आवश्यक अशी परिस्थिति या देशांत निर्माण होईल. जमातवादी पक्ष फुटून अथवा विलय पावून त्या ठिकाणीं तत्त्वनिष्ठ राजकीय पक्ष निर्माण होण्याचा काळ झपाट्यानें जवळ येत आहे. कॉंग्रेस अथवा राष्ट्रीय पक्षांत जसे निरनिराळ्या धर्मांचे व जातींचे लोक आहेत, तसेच समाजवादी व कम्युनिस्ट या पक्षांतहि आहेत. याशिवाय जे इतर राजकीय पक्ष आज आपल्या देशांत दिसत आहेत ते विशिष्ट प्रांताबाहेर आपल्या राजकारणाचा प्रभाव पाडूं शकत नाहींत. याचें कारण त्या पक्षांचा पूर्वपरंपरेनें विशिष्ट जमातींशींच संबंध आलेला आहे. अशा कोणत्याही विशिष्ट जमातीला सर्वत्र प्रांतांत सारखें महत्त्व असणें शक्य नाहीं. म्हणून विशिष्ट जमातीच्या आश्रयावर फोंफावणारे हे पक्ष आपल्या विशिष्ट प्रांताहून इतर प्रांतात आपला प्रभाव पाडूं शकत नाहींत त्याचप्रमाणें प्रत्येक प्रांतांत अनेक जमाती असल्या तरी त्या अनेक जमातींपैकीं कोणती तरी एकादी जमातच तेथें प्रचंड बहुसंख्येनें असते आणि इतर जमाती लोकसंख्येनें फार थोडया असतात. यामुळें विशिष्ट जमातीचा आश्रय घेऊन आपला पक्ष वाढविण्याचें राजकारण सार्वत्रिक मतदानाच्या, संयुक्त-मतदारसंघाच्या आणि लोकशाहीच्या जमान्यांत कोणत्याहि प्रांतांत केवळ बहुसंख्य जमातीसच खेळतां येणार आहे. इतर जमातीच्या लोकांना जमातवादी राजकारण खेळण्याचा मोह होण्याचाहि संभव नाहीं. आणि जी बहुसंख्य जमात आहे तीहि तत्त्वनिष्ठ राजकीय मतभेदांनीं एकदां दुभंगली किंवा तिभंगली, म्हणजे हें उघड अथवा प्रच्छन्न स्वरूपांतील जमातवादी राजकारण कायमचें नष्ट होणार आहे. यासाठीं जे तत्त्वनिष्ठ राजकीय पक्ष असतील तेवढेच यापुढें आपल्या देशांत टिकतील आणि इतर सर्व पक्ष हळूंहळूं नामशेष होतील.

### राष्ट्राचें उज्ज्वल भवितव्य

अशा तत्त्वनिष्ठ राजकीय पक्षांनीं आपल्या तत्त्वांसाठीं स्वार्थत्याग करण्याची वृत्ति वाढवीत जाणें आणि दुसऱ्या पक्षासंबंधीं सहिष्णु वृत्ति धारण करणें, हेंच लोकशाही संस्कृतीचें आद्य लक्षण आहे. या देशांतील राष्ट्रीय आणि समाजवादी या दोनहि पक्षांत महात्मा गांधींच्या उपदेशामुळें ही सहिष्णु तत्त्वनिष्ठा बाणलेली आहे. या सहिष्णु तत्त्वनिष्ठेचें उज्ज्वल स्वरूप म्हणजेच सत्याग्रही वृत्ति होय. या सत्याग्रही वृत्तीचें पालनपोषण येथील राष्ट्रीय व समाजवादी पक्ष जितक्या प्रमाणांत करतील, तितक्या प्रमाणांत सशस्त्र क्रांति अटळ आहे, असा आग्रह धरणारा अविवेकी कम्युनिस्ट पक्ष मागें पडून या राष्ट्रांत अवश्य असणारी व अपरिहार्य झालेली सामाजिक व आर्थिक क्रांति घडून येईल व येथें लोकशाही संस्कृति दृढमूल होऊन जगाला शांतीचा मार्ग दाखवून देण्याचें जें कार्य परंपरेनें आपल्या राष्ट्रावर आलेलें आहे, तें तडीस नेण्याचें सामर्थ्य या राष्ट्रांत येऊं शकेल. मात्र, तसें होण्यापूर्वी आज या राष्ट्रांत जो एक कॉंग्रेस-पक्षच प्रमाणाबाहेर वाढलेला आहे त्याची बरीच खच्ची होऊन त्याला तत्त्वनिष्ठ व शिस्तबद्ध राष्ट्रीय पक्षाचें स्वरूप यावयास पाहिजे. तसेंच समाजवादी पक्ष हा त्याच्याच तोडीचा एक तुल्यबल राजकीय पक्ष म्हणून पुढें आला पाहिजे. या गोष्टी घडण्यास समाजवादी पक्षानें सत्याग्रहावरील आपली निष्ठा यत्किंचित्‌हि ढळूं न देतां शेतकरी-कामकरी वर्गाची प्रचंड संघटना करून त्या वर्गाला आपल्यावरील अन्यायाशीं व जुलमाशीं शांततेनें झगडण्याचें प्रत्यक्ष शिक्षण देत राहिलें पाहिजे. यांत तो पक्ष जितकें यश संपादन करील तितकें आपल्या राष्ट्राचें भवितव्य उज्ज्वल होणार आहे. या सत्याग्रही मार्गानें समाजवादी क्रांति घडविण्याचें कार्य राष्ट्रीय पक्षाकडून होण्याचा संभव आज उरलेला नाहीं. म्हणून हें कार्य जर समाजवादी पक्षाकडून घडलें नाहीं तर, त्याला इतिहासक्रमागत आपलें कर्तव्य पार पाडतां आलें नाहीं, असें ठरेल आणि मग कम्युनिस्ट पक्षाचें अविवेकी राजकारण फोंफावत जाऊन येथील लोकशाही व राष्ट्रीयत्व या दोहोंनाहि धोका आल्याशिवाय राहाणार नाहीं.

श्री. किशोरलाल घ. मश्रूवाला

# सिद्धावस्था आणि व्यवहार

श्री. शंकरराव देव यांचा 'नवभारत'च्या फेब्रुवारी १९५१च्या अंकांतील 'गीता, टिळक आणि गांधी' हा लेख वाचला. परंतु त्यांनीं त्या लेखांत ज्या लेखांचा उल्लेख केला आहे, ते वाचले नाहींत. वाचण्याची स्फूर्तिहि नाहीं. लोकमान्यांचें '–रहस्य' वाचून ३५ पेक्षां अधिक वर्षें लोटलीं. त्यानंतर एकदां उजळणी केली होती. त्यालाहि जवळ जवळ २० वर्षें झालीं. त्यानंतर पुनः वाचलें नाही. हौसहि नाहीं.

या वादविवादांत मला फारसा रस वाटत नाहीं. ज्यावर 'यावत्कालस्तावद्वादः' होत राहील अशापैकीं हा विषय आहे. ज्यांचीं मतें, स्वभाव, शुभाशुभ वासना अपक्व आहेत, त्यांच्या विचारांत अशा वादांतून मतपरिवर्तन होत असेल कदाचित्; परंतु केवळ ह्या वादाविवादांतुन श्री. तात्यासाहेब करंदीकर, भाऊसाहेब चिपळूणकर किंवा शंकरराव देव व त्या प्रत्येकांचे साथीदार यांच्या विचारांत कांहीं फरक पडणार नाहीं. पुष्कळ चर्चा व शास्त्रार्थ करून प्रत्येक जण स्वतःच्या पूर्वमतावरच जास्त दृढ होईल. म्हणून ज्या वादांतून वाद करणाऱ्यांना तत्त्वबोध होणार नाहीं, तो चालविण्यांत काय अर्थ ?

"नामूलं लिख्यते किंचित्" ही शास्त्री वर्गाची प्रतिज्ञा असते व 'मूल' म्हणजे शास्त्रांचा आधार असा अर्थ केला जातो. सुदैवानें म्हणा, दुर्दैवानें म्हणा, मजवर अशा प्रकारें अनेक शास्त्रें धुंडाळण्याचा संस्कारच खोल रुजलेला नाहीं. पंडितांवर एक असा संस्कार घडलेला असतो कीं मुखांतून निघालेल्या मतापेक्षां लेखणींतून निघालेलें मत विशेष प्रमाणरूप. लेखणी जेवढी विशेष जुनी असेल, व तिच्या मालकाचा पत्ता कमी लागत असेल, तेवढी तिची किंमत जास्त. तें मत लेखकानें स्वानुभवांतून सांगितलें कीं तर्कांतून, पाहून सांगितलें कीं ऐकून, ह्याची परवा नाहींच असें अगदीं नसलें, तरी तें लेखणीबद्ध असलें म्हणजेच त्याची किंमत वाटते. त्याहून उलट एखाद्या जिवंत किंवा समकालीन माणसानें मत दिलें, तर आमची त्याच्यावर गुरु म्हणून निष्ठा असेल, तर तें आम्हांला विशेष मान्य होण्याचा संभव! परंतु तो आमचा गुरु नसला, तर तें मत पूर्व ग्रंथप्रमाणित नसल्यास मान्य होऊं शकणार नाहीं. पटवायचें असल्यास ग्रंथ दाखविला पाहिजे. मग तो खुबीनें क्षेपक करून आणिला, किंवा 'सारस्वत' व्याकरणासंबंधीं जी किंवदन्ती आहे, त्याप्रमाणें फसविण्याकरितां नवीनच तयार करून आणला तरी चालेल! त्याचा प्रत्यक्ष अनुभवी मिळत नसला तर एखादी काल्पनिक कथा बनवूनहि प्रमाण म्हणून निर्माण करण्यास हरकत नाहीं. शास्त्राधार शोधणाऱ्यांची अशी स्थिति झाली आहे!

मोठे मोठे शास्त्री जेव्हां इतिहाससंशोधनाच्या कामाला लागतात, तेव्हां महाभारत व तदन्तर्गत गीता या संबंधानें त्यांचें जें मत असतें तें, त्या संशोधनमंदिरांतून निघून ते धर्मचर्चेच्या मंदिरांत शिरले म्हणजे बदलतें. पुरातत्त्वमंदिरांत ज्या गीतेसंबंधीं, ती मूळ महाभारतांतील भाग नाहीं, त्यांतील सर्व ७०० श्लोक 'अस्सल' नाहींत वगैरे ते सांगतात, त्याच गीतेसंबंधीं धर्ममंदिरांत बसल्यावर, प्रत्यक्ष भगवंतांनीं श्रीकृष्णाच्या रूपानें कुरुक्षेत्रांत महाभारत-युद्ध सुरू होण्याच्या १–२ तास पूर्वी व मार्गशीर्ष शुक्ल ११ च्या निश्चित दिवशीं ती श्लोकबद्ध करून सांगितली व हल्लींच्या ग्रामोफोन रेकॉर्डप्रमाणें अगदीं त्याच रूपांत प्राप्त झाली, यापेक्षां कमी भूमिका त्यांना मान्य होणार







नाहीं. जर कोणी सांगितलें कीं, गीतेंतील श्लोक वा ह्या चर्चेंतील 'यस्य नाहंकृतो भावो'' इ. श्लोक एका सूक्ष्म वेदान्ततत्त्वविचारकाचें मत होय व तें कितपत ग्राह्याग्राह्य आहे याचा आदरानें परंतु स्वतंत्र बुद्धीनें विचार करूं या, तर तें चालणार नाहीं. निदान स्वतःस हिंदुधर्मी म्हणविणाऱ्यास तेवढी अनास्थेची भूमिका घेतां येत नाहीं. तें भगवंताचें वाक्य असून खरेंच आहे असें समजून त्याचें समर्थनच केलें पाहिजे. ह्यालाच 'शास्त्राची एकवाक्यता, समन्वय' आदि करून दाखविणें असें म्हटलें जातें. परंतु ही एक बौद्धिक कसरतच करावयाची असते, व कोणाचा खेळ उत्कृष्ट आहे, हेंच ठरवावयाचें असतें. प्रस्तुत श्लोकावर जी चर्चा चालली आहे, त्यावर टिळकांची बौद्धिक कसरत उत्तम कीं गांधींची हेंच ठरविण्याचा प्रयत्न नाहीं का हा?

तसें नसतें तर आम्ही निराळ्याच पद्धतीनें याचा विचार करायला लागलों असतों.

"यस्य नाहंकृतो भावो—" ह्या श्लोकांतील मत कोणाचें म्हणून समजावें? ज्यानें तो श्लोक बनविला त्याचें कीं श्रीकृष्णाचें? "श्रीभगवानुवाच" असें त्यावर मांडलेलें असलें तरी अव्यक्त देवाची नभोवाणी म्हणून ती कोणी समजत असेल असें मला वाटत नाहीं. फार तर श्रीकृष्ण हा साक्षात् भगवंताचा अवतार, असें म्हणून "श्रीकृष्ण उवाच" व "श्रीभगवानुवाच" या दोहोंचा अर्थ एकच असें तो सांगेल.

पुढें प्रश्न हा कीं, ज्यानें हा सिद्धान्त प्रतिपादिला त्यानें स्वतः सिद्धदशा प्राप्त करून व त्याप्रमाणें वागून तो सांगितला, कीं वेदान्तसिद्धान्ताची जी तर्कप्राप्त पराकाष्ठा तिचें तात्पर्य म्हणून? सर्व लोकांची हत्या करण्याची, व तसें करून मनात मुळींच वाईट न वाटूं देण्याची ज्यांची तयारी व हिंमत आहे व तसे प्रयत्नहि ज्यांनीं केले आहेत, असे ट्रूमन-स्टालिन-सारखे मानव जगांत आहेत व हिट्लर-मुसोलिनी आमच्या कालांत होऊन गेले आहेत. तेव्हां असा मनुष्य होऊं शकत नाहीं असें मानण्याचें कारण नाहीं. परंतु ते अहंकारशून्य, रागद्वेषहीन, अलिप्त-बुद्धि, सिद्ध किंवा ज्ञानी असल्याची आम्हाला त्यांच्या संबंधीं प्रचीति आली नाहीं. त्यांनींहि असी आपली ब्रह्मदशा सांगितली नाहीं. उलट पक्षीं, आम्हांला तीं आसुरी वृत्तीचींच माणसें वाटतात. तेव्हां त्यांच्यापैकीं एलाद्याच्याहि संबंधानें 'हत्वापि स इमाँल्लोकान्न हन्ति न निबध्यते' हा श्लोकार्ध लागू करतां येणार नाहीं.

बरें, आमच्या कालांत ज्यांच्या सिद्धदशेसंबंधानें पुष्कळांना श्रद्धा व आदर आहे असे जे रामकृष्ण परमहंस, रमणमहर्षि, अरविंद वगैरे, यांच्याकडे पाहिलें तर त्यांनीं हा श्लोक अमान्य केला नसला, तरी तसें कधीं आचरून दाखविलें नाहीं. सर्व लोक जाऊं द्या, अर्धे लोक, पाव लोक, एकदशांश लोकांची सुद्धां हत्या करून दाखविण्याची कधीं त्यांनीं तयारी दाखविली नाहीं! रामकृष्ण परमहंस मांसभोजी देवीभक्त असूनहि जसजसे ते वाढत गेले, तसतशी त्यांची अहिंसावृत्ति वाढत गेल्याचें आढळतें. रमणमहर्षि तर बोलूनचालून 'अहिंसा परमो धर्मः'-चेच उपासक होते. ज्ञानप्राप्तीनंतर त्यांनीं कधीं सर्पाला किंवा विंचवालाहि मारलें असेल असें दिसत नाहीं. दुष्टांनीं मारलें तेव्हां स्वरक्षणा-पुरताहि प्रतिकार त्यांनीं केला नाहीं असें एकलें आहे. अरविन्दांनीं हिंसेला अनुमोदन दिलें खरें; पण स्वतः ती करून दाखविली नाहीं. तेव्हां हिंसेचें कार्य करतांना अनहंकारभाव व अलिप्तबुद्धि ठेवणें कितपत साधतें, याचा त्यांना असा प्रत्यक्ष अनुभव कधीं आला नसावा. तेव्हां त्यांचें हिंसेस अनुमोदन अनुभवाचें नसून तर्काची भरारीच होय असें म्हटलें पाहिजे.

बरें, प्रत्यक्ष श्रीकृष्णाकडे पाहिलें तर त्यांनीं क्षत्रिय असूनहि स्वतः शस्त्रसंन्यासच केला! पुढें यादवींत त्यांनीं कांहीं करून दाखविलें असें म्हणावें तर ती गोष्ट महाभारतांतील नसून पुराणांतील आहे, व पुराणांतील गोष्टींत ऐतिहासिक भाग किती व काल्पनिक कथा किती हें ठरविण्यास कांहींच साधन नाहीं. भागवताचा ११ वा स्कंध गीतेचीच पूर्ति म्हणून धरला, तर त्यांत भक्ति व अहिंसा यांचेंच समर्थन दिसतें, क्षात्रकर्माचें नाहीं. यादवीच्या कथेकडे वळलें म्हणजे सर्वच अद्भुतरसाचा सागर! ब्राह्मणाचा शाप, विशिष्ट प्रकारच्या (वेतस) वेताच्या साधनानें युद्ध, दारूपानाची मस्ती, आत्म-

# सिद्धावस्था आणि व्यवहार

रक्षण अशा विलक्षण व अकल्पित परिस्थितींत ती घटना घडली असेंहि त्या वर्णनावरून समजतें. एवढी हिंसा झाल्यावर श्रीकृष्णाच्या मनाला वाईट वाटलें नाहीं, अत्यंत समाधान वाटलें, असें दिसत नाहीं. ते अत्यंत उदास, हताश झाले. त्याप्रमाणें हिन्दुमुसलमानांतील दंग्यांनें गांधींना जीव नकोसा झाला, १२५ वर्षें जगण्याचा त्यांना उत्साह राहिला नाहीं, तसेंच श्रीकृष्णालाहि वाटलें असें दिसतें. भागवतकारासारख्या कोणी अद्‌भुत रसप्रिय व गांधींस भगवान् करून दाखवणाऱ्या चरित्रकारानें या पुढें जर असें लिहिलें कीं, व्याधाप्रमाणें गोडसेहि गांधींच्या इच्छेनें व प्रेरणेनेंच, ते आत्मरूपांत निमग्न होण्याच्या तयारींत असतांना, त्यांना मारण्यास उपस्थित झाला, तर असें काव्य निर्माण करणें अशक्य नाहीं !

सारांश हा कीं, ज्याचा अनहंकारभाव पूर्णपणें सिद्ध झाला आहे अशी ज्याच्याविषयीं आम्हांला पुष्कळच श्रद्धा आहे, अशा कोणा ऐतिहासिक पुरुषानें सर्व लोकांची हिंसा करून त्यांत अनासक्ति, अलिप्त बुद्धि, हर्षशोकविरहितता कशी राहते त्याचा प्रत्यक्ष वस्तुपाठ व निरूपण जगापुढें मांडलें नाहीं. वेदांतविचार येथपर्यंत आम्हांस नेऊन पोहोंचवूं शकतो एवढेंच ह्या श्लोकांतून तात्पर्य काढतां येईल. ह्या श्लोकांचा आधार सांगून ट्रूमन—स्टालिन-सारख्यांना सर्व जगाचा संहार करून आमच्या देशांतील वेदान्त शिकलेल्या महत्त्वाकांक्षी लोकांना शुष्क वेदान्त सांगतां येईल व दंभ करतां येईल. त्यांपेक्षा ट्रूमन—स्टालिन विशेष प्रामाणिक म्हटले पाहिजेत. ते अनहंकारत्वाचा आव तरी धरीत नाहींत. रागद्वेषयुक्त सामान्य माणसाचे जे स्वभावधर्म असतात त्याला चिकटून ते आपली नीति ठरवतात.

जें कार्य सिद्ध झाल्यावर करावयाचें तें कार्य साधकदशेंतहि केलें पाहिजे म्हणजे ती साधना होईल. असें धरल्यास हिंसेचा एकसारखा अभ्यास चालूं ठेवून साधकानें ‘ हत्वापि स इमाँल्लोकान् न हन्ति न निबध्यते ” ही भूमिका गांठली पाहिजे ! असा साधनमार्ग कुठें प्रतिपादिला गेल्याचें मला माहीत नाहीं. गीतेच्या १३ व्या अध्यायांत ज्ञानाचीं लक्षणें म्हणून जीं दिलीं आहेत तीं सिद्ध व साधक दोहोंना लागूं होतील अशा प्रकारचीं आहेत. असें म्हटलें नाहीं कीं साधकदशेंत अशीं लक्षणें असावींत व सिद्धदशेंत याच्याहून उलट लक्षणें असूं शकतील ! ज्ञानेश्वरांच्या मताला कांहीं महत्त्व द्यावयाचें असल्यास त्यांनीं तर उलट लक्षणांना अज्ञानाचीं लक्षणें म्हणून सरळपणें सांगितलें आहे. भगवंतांनींहि सिद्धाच्या लक्षणांत हिंसेचा ओझरता निर्देशहि न करतां अहिंसेचाच स्पष्ट निर्देश केला आहे व इतर लक्षणें सांगितलीं आहेत, तींहि अहिंसेशा अनुरूपच आहेत. सिद्धदशा प्राप्त झाल्यावर ज्यास सर्व जगाची हिंसा करण्याची हिम्मत प्राप्त करवून द्यायची आहे, अशास साधकावस्थेंत ही अहिंसेची उलटी कसरत करायला भगवंतांनीं कां सांगितलें हें भगवंतालाच माहीत ! आणि ज्ञानेश्वरांनाहि हें काय सुचलें कीं या लक्षणांचें विवरण करतांना आपल्या तेजस्वी भाषेंत त्यांनीं अधिकांत अधिक ओव्या अहिंसेवरच लिहिल्या !

जें काम मी जन्मभर सहजस्वभावानें पण साहंकार करीत आलों असेन, तें काम जर समाजोपयोगी असेल तर तें करीत राहून त्याबरोबर मला चित्तशुद्धीची व ज्ञानप्राप्तीची साधनाहि करतां येईल, व सिद्ध झाल्यावर निरहंकारपणेंहि तें करतां येईल. त्या कामांत एखादें कर्म कठोरपणाचें भासत असलें तरी तें मला निरहंकारबुद्धीनें करतां येईल. पण जें काम मी सहजपणें केलें नाहीं, साधकदशेंत मुद्दाम टाळलें, तें मी सिद्ध झाल्यावर करीन व करूं शकेन असें मला तरी आज शक्य वाटत नाहीं. अर्थात् मी सिद्ध झालों नाहीं असें कबूल करूनच हें सांगत आहे. उदा०, मी “ हरिजन ” पत्राचें संपादन आज साहंकारपणें करीत असेन तर निरहंकारपणेंहि तें करूं शकेन अशी आशा बाळगूं शकतों. पण जर आजपर्यंत मी कधीं एखाद्याहि माणसाला ठार केलें नाहीं व साधकावस्थेंत शत्रूविषयींहि तसा विचार स्वप्नांत सुद्धां उठल्यास मीं पश्चाताप केला असेल, तर सिद्ध झाल्यावर मात्र मी त्या शत्रूलाच नाहीं तर अनेक निरपराध्यांना सुद्धां ( कारण “ इमाँल्लोकान् ” मध्यें निरपराधीच असणार ! ) ठार करीन ह्याची शक्यता आज तरी








ख्वाज़ा अब्दुल मजीद्खाँ : अनुवादक : श्री. श्रीपाद जोशी

# गांधीजींचा सर्वधर्मसमभाव

" काळाच्या जबरदस्त बडग्यानें जितक्या सहजासहजीं इतर सर्व घटनांचा विसर पाडलेला आहे तितक्याच सहजतेनें त्यानें आपल्या फटकाऱ्यासरशीं राष्ट्रीय नेत्यांना निष्प्रभ बनवून टाकलें आहे. परंतु महात्मे आणि साधुसंत हे मात्र नेहमींच अमर राहतील. "

—स. राधाकृष्णन्

आजपर्यंत[1] जगानें जितक्या क्रान्तिकारकांना जन्म दिला आहे त्यांच्यापैकीं सर्वांत मोठे क्रांतिकारक गांधीजीच होत. त्यांना राष्ट्रपिता म्हटलें जातें आणि तेंच त्यांचें यथार्थ वर्णन होय. त्यांचें पवित्र बलिदान तर अनुपम व अद्वितीय आहे. आधुनिक भारताचे निर्माते या नात्यानें त्यांचें नांव इतिहासांत सदैव जिवंत राहील, परंतु माणसा-माणसांमध्यें प्रेम व ऐक्य निर्माण करणारे या नात्यानेंहि त्यांचें नांव सुवर्णाक्षरांत लिहिलें जाईल. आपलें निश्चित धोरण आणि दृढता यांच्या योगें त्यांनीं भिन्नभिन्न वर्ण, वंश आणि जाती-जमाती यांच्यांतील संघर्ष व झगडे थांबविण्यासाठीं आटोकाट धडपड केली. त्यांच्या स्वतःच्याच शब्दांत सांगावयाचें तर—' प्रत्येक जीवमात्राशीं मी स्वतःला सम्बद्ध करतों. श्रीमद्‌भगवद्‌गीतेच्या शब्दांत बोलावयाचें म्हणजे, मी शत्रु व मित्र या दोघांशींहि शांततेनें राहूं इच्छितों. यामुळें माझी देशभक्ति हा मला अखंड स्वातंत्र्य व शांतता यांकडे घेऊन जाणाऱ्या प्रवासांतील एक टप्पा आहे. "

महात्मा गांधी इंग्लंडमध्यें शिकत असतां त्यांचें वय फक्त वीस वर्षांचें होतें. इतक्या लहान वयांत त्यांनीं जिज्ञासू वृत्तीनें बायबल विकत घेऊन वाचलें. ' जुन्या करारा 'मध्यें त्यांना फारशी गोडी वाटली नाहीं, परंतु ' नव्या करारा ' चा मात्र त्यांच्यावर खूपच प्रभाव पडला. त्यांतहि ' गिरिप्रवचना '-( Sermon on the Mount )-चा त्यांच्यावर विशेष परिणाम झाला. त्याच सुमारास त्यांना कार्लाईलचें पुस्तक वाचावयास मिळालें. त्या योगें त्यांना धर्मसंस्थापक हजरत मुहम्मद पैगंबरांच्या अभ्यास करण्याची संधि मिळाली. दक्षिण आफ्रिकेंतील आपल्या प्रारंभिक मुक्कामांत ज्या वेळीं गांधीजी वकीली करीत असत, त्या वेळीं त्यांनीं ख्रिस्ती धर्मासंबंधीं अनेक पुस्तकें वाचलीं. त्यांनीं प्रोफेसर मॅक्स मुल्लर यांच्या एका ग्रंथाचें विशेष अध्ययन केलें आणि मुहम्मद पैगंबरांसंबंधीं माहिती मिळविण्याचें कार्य चालू ठेवलें. भगवद्‌गीता आणि टॉलस्टॉयचे ग्रंथ यांनीं त्यांच्या जीवनावर विशेष छाप पाडली आणि त्यांच्या अंतःकरणावर या ग्रंथाचा ठसा खूप खोलवर उमटला.

जन्मभर विनम्रता राखणें हा गांधीजींच्या स्वभावांतील एक अद्‌भुत गुण होता. ते अत्यंत समतोल वृत्तीचे आणि निष्कपट हृदयाचे असून नेहमीं आवश्यक गोष्टींचा विचार आधीं करीत असत. इतर धर्मांविषयीं त्यांच्या अंतःकरणांत श्रद्धेची भावना वास करीत होती; इतकेंच नव्हे तर सर्व धर्म सारखेच आदरणीय आहेत; आपणां सर्वांना एकाच पर्वतशिखरावर जाऊन पोहोंचाव-

१ प्रस्तुत लेख ' आजकल ' या उर्दू मासिकामध्यें प्रसिद्ध झालेल्या लेखाचा संक्षिप्त अनुवाद आहे. या लेखाचे मूळ लेखक ख्वाजा अब्दुल मजीदखाँ हे एक सुप्रसिद्ध राष्ट्रीय मुसलमान असून अलाहाबाद येथील ' हिंदुस्थानी कल्चर सोसायटी 'चे अध्यक्ष आहेत. —अनुवादक









याचें आहे; परंतु जेथें आपण उभे आहोंत तेथून त्या शिखरापर्यंत जाऊन पोंचण्याचे मार्ग वेगवेगळे आहेत, आणि आपण ज्या वस्तूच्या प्राप्ती-साठीं धडपडत आहोंत ती वस्तु एकच आहे; इस्लामचा अल्ला, ख्रिस्तांचा गॉड व हिंदूंचा ईश्वर हे एकच आहेत—या गोष्टींवर ते विशेष भर देत असत. त्यांचें असें सांगणें असें कीं, ज्याप्रमाणें हिंदूंमध्यें 'परमात्म्या'चीं अनेक नांवें आहेत त्याच-प्रमाणें मुसलमानांमध्यें अल्लाचीं अनेक नांवें आहेत. या वेगवेगळ्या नांवांमुळें कसल्याहि प्रकारचा भेदभाव व्यक्त होत नसून ते परमेश्वराचे वेगवेगळे गुण आहेत व त्यांना आपण वेगवेगळ्या नांवांनीं संबोधीत असतों. वस्तुतः परमेश्वर हा सर्व प्रकारच्या वर्णनांच्या व स्तुतीच्या अतीत आहे. परंतु विनम्र मानवानें आपली नम्रता व्यक्त करण्यासाठीं त्याच्या वेगवेगळ्या गुणांवरून त्याला अनेक नांवें प्रदान केलीं आहेत. त्याचें वर्णन करणें शक्य नाहीं, अथवा त्याच्या योग्यतेचें कांहीं मोजमापहि होऊं शकणार नाहीं. खऱ्या अर्थानें ईश्वराचें अस्तित्व मान्य करणें, म्हणजे सर्व धर्मांना सारखेंच मोठें लेखणें होय. माझा धर्म इतर सर्व धर्मांहून श्रेष्ठ आहे व म्हणून इतर धर्मांच्या लोकांना माझ्या धर्मांत घेऊन येण्याचा मला पूर्ण हक्क आहे, असें म्हणणें म्हणजे असहिष्णुतेची पराकाष्ठा होय आणि असहिष्णुता हा हिंसेच्या अनेक प्रकारांपैकींच एक आहे.

जगांतील साठ टक्के दुःखांचें व आपत्तींचें कारण असें आहे कीं, लोकांच्या धार्मिक श्रद्धांना सिद्धांताचा आधार नसतो. कांहीं जमाती माणसाच्या मानसिक शक्ती इतक्या विखरून टाकतात कीं, त्यांतील कांहीं लोक इतर बाबतींत व कार्यांत कितीहि स्वतंत्र वृत्तीचे व बुद्धिनिष्ठ असले तरी, धार्मिक बाबतींत मात्र स्वतंत्र वृत्तीची व योग्य अशी थोडी देखील टीका सहन करूं शकत नाहींत. पंडित जवाहरलाल नेहरू यांनीं ता. १९ एप्रिल १९५० रोजी 'इंडिअन कौन्सिल ऑफ कल्चरल रिलेशन्स'च्या सभेंत भाषण करतांना श्रोत्यांचें लक्ष या खेदकारक परि-स्थितीकडे वेधलें होतें. महामंत्र्यांनीं आपले अनुभव सांगतांना असें म्हटलें होतें कीं, कोणाहि व्यक्ती-विषयीं मनांत वैरभाव न बाळगतां मी अत्यंत नम्र-पणें असें सांगूं इच्छितों कीं, जगामध्यें कित्येक मोठ-मोठे धर्म उदयास आले आणि त्यांनीं मानवतेवर असामान्य परिणाम केला. त्या धर्मांनीं जो कांहीं प्रचार केला तो कदाचित् चांगलाहि असेल. परंतु त्या प्रचाराचा परिणाम मात्र अत्यंत वाईट झाला. कोणत्याहि गोष्टीसंबंधीं प्रथम कांहीं तरी सांगावया-चें आणि मग पुन्हां 'अमुक ठिकाणीं थांबा' अशी दुरुस्ती सुचवावयाची याचा परिणाम असा होतो कीं, त्यायोगें समाजाची प्रगति खुंटते व अशा प्रकारें संस्कृतीच्या विकासांत अडथळा निर्माण होतो. या विषयासंबंधीं गांधीजींनीं जें मार्गदर्शन केलें आहे, त्यायोगें मेलेलीं मनें देखील जिवंत होऊं शकतील. ते म्हणतात : "इस्लाम हा एक आवेश व स्फूर्ति उत्पन्न करणारा धर्म आहे आणि म्हणूनच कुराणशरीफ हा एक हितकर ग्रंथ आहे व हजरत मुहम्मद हे एक पैगंबर (प्रेषित, द्रष्टे) होत, या-विषयीं मला मुळींच संशय नाहीं. हिंदुधर्म, ख्रिस्ती-धर्म आणि अग्निपूजकांचा धर्म हेहि पुरोगामी आहेत, असें मला वाटतें. या धर्मांचा जितका कांहीं अभ्यास मी केला आहे त्यावरून मी या निष्कर्षावर येऊन पोंचलों आहे कीं, सर्व धर्मांमधून ऐक्य व ऐकमत्य यांचा एक सामाईक विचार शोधून काढणें, ही गोष्ट आपल्या दृष्टीनें अत्यंत आवश्यक व अपरि-हार्य होऊन बसलेली आहे. या सामाईक विचाराचा केंद्रबिंदु एकच आहे आणि तो सत्य व अहिंसा हाच. या केंद्रबिंदूच्या योगें सर्व धर्मांतील विरोध नाहींसा होऊन त्यांच्यामध्यें आंतरिक ऐक्य निर्माण करणें कांहीं फार अवघड जाणार नाहीं. जेव्हां आपण भिन्न धर्मांकडे पाहूं लागतों, तेव्हां एका झाडाच्या वेगवेगळ्या पानांप्रमाणें त्यांच्यांत फरक असल्याचें दिसून येतें हें खरें; परंतु त्यांच्या मूला-धारांकडे सूक्ष्म नजर फेंकल्यास ते सर्व एकच आहेत असें आढळून येतें. जोपर्यंत आपणाला या मूलभूत एकत्वाची जाणीव होणार नाहीं, तोंपर्यंत धर्मांच्या नांवावर होणारे झगडे मुळींच थांबणें शक्य नाहीं."—('हरिजन', १३ जुलै १९४०)

हिन्दु-मुस्लिम ऐक्यासाठीं गांधीजींनीं १९४४ च्या सप्टेंबर महिन्यांत जें उपोषण केलें होतें, त्या-संबंधीं त्यांनीं विशेषेकरून असें सांगितलें होतें कीं,

'कोणाहि हिन्दूनें अथवा मुसलमानानें आपल्या धार्मिक सिद्धान्तांचा त्याग करावा, असें मी मुळींच म्हणणार नाहीं. प्रत्येकाची आपल्या धर्मा-वर पूर्ण निष्ठा असली पाहिजे; परंतु प्रत्येक हिंदु-मुसलमानाला मी एवढें मात्र अवश्य सांगेन कीं, आपल्या भौतिक फायद्यासाठीं त्यांनीं आपापसांत भांडणतंटे करूं नयेत.'

भिन्नभिन्न धर्मश्रद्धांमध्यें विरोध आहे, ही गोष्ट गांधीजींना कधींच पटली नाहीं. त्यांच्या अंतःकरणांतील साऱ्या मानवांसंबंधींचें प्रेम हें विश्वा-इतकें व्यापक, स्वर्गाइतकें उच्च आणि सागराप्रमाणें अथांग होतें. त्यांनीं जन्मभर जातीय ऐक्यासाठीं आटोकाट धडपड केली आणि वेगवेगळ्या धर्मां-मध्यें परस्परमित्रत्वाची भावना वाढविण्याचा प्रयत्न केला. आधुनिक युगाच्या या शांतिसम्राटाचे, मैत्री, प्रेम व ऐक्य यांच्या या प्रेषिताचे विचार आपण वाचले पाहिजेत, ते समजावून घेतले पाहिजेत, त्यांची कदर केली पाहिजे, ते आत्मसात् केले पाहिजेत व त्यासाठीं आपलें जीवन वाहिलें पाहिजे. त्याखेरीज अन्य मार्ग नाहीं :

"हिन्दु धर्मानें सर्व धर्मश्रद्धांचें सार आपल्यामध्यें समाविष्ट करून घेतलेलें आहे. म्हणजे आतां तो एखादा स्वतंत्र धर्म राहिलेला नाहीं. यामुळें त्याचा इस्लामशीं अथवा मुसलमानांशीं कोणत्याहि प्रकारचा झगडा नाहीं."—('हरिजन', २८ सप्टेंबर १९४७)

"हिन्दुधर्म हा एक महान् धर्म आहे. त्याच्या ठिकाणीं समावेश करून घेण्याची व सहिष्णुतेची वृत्ति फार मोठी आहे. परमेश्वर सर्वव्यापी आहे. आपली उपासना प्रेमानें व खेळीमेळीनें केली जावी, अशी त्याची इच्छा असते. ती उपासना करण्याची पद्धत कोणती आहे व तिची भाषा कोणती आहे, ह्या प्रश्नच उद्भवत नाहीं. यामुळें कुराणांतील मंत्र उच्चारण्यास हरकत घेणें हें हिंदुधर्माच्या शिकवणुकी-विरुद्ध आहे."—('हरिजन', २० एप्रिल १९४७)

"वेगवेगळ्या जमातींमध्यें प्रेमाचें व ऐक्याचें नातें सिमेंटप्रमाणें मजबूत होत असलेलें पहावें आणि जरूर पडल्यास तें सिमेंट तयार करण्यासाठीं आपलें रक्तहि द्यावें हें माझ्या जीवनाचें सर्वप्रथम ध्येय आहे. परंतु हें कार्य करण्यापूर्वीं मला मुसलमानांची अशी खात्री पटवावयाची आहे कीं, मी जसें हिन्दूंवर प्रेम करतों तसेंच त्यांच्यावरहि माझें प्रेम आहे. माझा धर्म मला असें शिकवितो कीं, आपण सर्वांशीं सारख्याच प्रेमानें वागलें पाहिजे."

—('यंग इंडिआ', २५ सप्टेंबर १९२४)

खरोखर बापूजी आपल्या शब्दांप्रमाणें निर्मळ हृदयाचे व सच्चे होते. हिन्दु व मुसलमान यांनीं एकोप्यानें व शांततेनें जीवन व्यतीत करावें याच ध्येयापायीं त्यांनीं आपल्या प्राणांचें बलिदान दिलें. गांधीजींनीं उजळलेली ज्योत पाजळत ठेवण्यासाठीं आपण अशी एक संस्था स्थापन केली पाहिजे, कीं जिचा उद्देश वेगवेगळ्या जाती-जमातींत परस्पर ऐक्य व शांतता प्रस्थापित करणें हा असेल. या संस्थेच्या सभासदांनीं गांधीजींचे आदर्श प्रत्यक्षांत उतरविण्याची प्रतिज्ञा केली पाहिजे. या संस्थेचें ध्येय व तिचीं उद्दिष्टें पुढीलप्रमाणें ठरविण्यांत यावींत :

(१) वेगवेगळ्या धर्मांचें अध्ययन करण्यास प्रोत्साहन देणें. वेगवेगळे धर्म, त्यांचे पवित्र ग्रंथ, संत, महात्मे व विद्वान् यांच्यासंबंधीं आदर निर्माण करून माणसामाणसांमध्यें ऐक्याची व मित्रत्वाची भावना वाढविणें.

(२) वेगवेगळ्या धर्मांच्या अनुयायांमध्यें स्नेहसंबंध निर्माण करून ते वाढविण्यासाठीं (अ) भाषणें करविणें, लहान-मोठ्या पुस्तिका छापविणें आणि अभ्यासमंडळें स्थापन करणें; (आ) ईद, दिवाळी, वसंत, ख्रिस्तमस वगैरेसारखे सण सामु-दायिक रीत्या साजरे करणें. (इ) वेगवेगळ्या धर्मांचे प्रेषित, पुढारी व साहित्यिक यांचे जन्म-दिवस सामुदायिकपणें साजरे करणें. (ई) गांधीजींचे लेख व भाषणें छापवून त्यांचा प्रसार व प्रचार करण्याचा प्रयत्न करणें. (उ) संयुक्त सभासंमेलनें, एकत्र जमून खाण्यापिण्याचे व मनोरंजनाचे कार्यक्रम घडवून आणणें.

वर सांगितलेले उपाय अंमलांत आणल्यास धार्मिक पक्षांधता, जातिवैमनस्य व वांशिक तिरस्कार हीं नाहींशीं होण्यास वेळ लागणार नाहीं, अशी माझी पूर्ण खात्री आहे.

---












# डोंबाऱ्याचा खेळ

डुबुक् डुबुक् डुबुक्
डुबडुब्ब डुबडुब्ब डुबडुब्ब—
डुबुक् डुबुक् डुबुक्
"ये दादा, ये मामा, ये तात्या
ये आई, ये ताई, ये माई
नागोबा देवाचं दर्शन घे
अस्सल जातीचा जातिवंत ह्यो
दाह्याचा आंकडा ह्येच्या फणीवर
दूध घाला, माई
दूध पाजा, आई
नागोबादेवाचा दुवा घेऊनी
कच्च्याबच्च्यासंगं सुखांत राव्हा"

डुबुक् डुबुक् डुबुक्
डुबडुब्ब—डुबडुब्ब—डुबडुब्ब
डुबुक् डुबुक् डुबुक्
"आलालालाला ऽ ह्यो बघा आला
पोराबाळांनो, मागं तुमी सरा
आईसनी पाहूं द्या
वैनीसनी देखूं द्या
पोटाला देतील शिळापाका तुकडा
धर्माच्या बहिणीला येईल दया
ते माडीवरलं दादा
हे खिडकींतलं मामा
अंगरखा येखादा जुनापुराणा
फाटका तुटका कोटही देतील
धर्माचा राजा
देणार दाता!"

डुबुक् डुबुक् डुबुक्
डुबडुब्ब डुबडुब्ब डुबडुब्ब
डुबुक् डुबुक् डुबुक्
"ह्ये आली बगा
बगा बगा ही—
गुलाबी खबुत्री
गुलाबी खबुत्री"
डुबुक् डुबुक् डुबुक्
"मायाबहिणींनो
मायाबापाहो
आतां तुम्ही देखा, कसरत नामी"
—आणि भराभर, कोंवळ्या पोरीच्या
हातापायाच्या
त्यानं घातल्या कितीक घड्या
आणि घेतल्या कोलांट्या उड्या
उलट्या सुलट्या
गिर्रकन् फिरत्या
उड्या आणि घड्या
कितीक केल्या!
—आणि लहान्या पोरीच्या त्या
ठेवून दगड पोटावर तो
राहिला उभा—

डुबुक् डुबुक्—
डुबडुब्ब—डुबडुब्ब डुबडुब्ब—
होती आळी सारी
पाहात कौतुकें
दयेचा ओलावा लागत होता



अनुक्रमणिका








अंतःकरणांत
खुपत होतें—टोंचत होतें
तोंच पुन्हां झाला, दुसरा खेळ सुरु
रस्त्याच्या कडेला
गटाराशेजारीं
संसारपोतडी घेऊन फाटकी
बसली होती चिंधी सावरून
फाटक्या पदराचा
आडोसा धरून
डोंबारीण ती तान्ह्या मुलाच्या
तोंडांत देऊन
वाळलेले स्तन !
उंच रोवलेल्या बांबूंवरती
चढला डोंबारी दोर घेऊन
—आणि आईच्या उराशीं बिलगून
शोधीत होतें जीवनरस
आईचें दूध ! आईचें दूध !
बालक कोंवळें
हिसकलें त्यानें
आणि बांधलें दोराच्या टोंकाला
तळतळून बालकानें त्या
टँयहॅ ऽऽऽऽ करून टाहो फोडला
आणि झोका गेला उंच आभाळाला.

डुबुक् डुबुक् डुबुक्
डुबडुब्ब डुबडुब्ब डुबडुब्ब डुबडुब्ब—

डुबुक् डुबुक् डुबुक्
कोंवळा मांसाचा गोळा उंच उंच
देखून झोका तो
तुटे अंतरांत
बाळांच्या आयांना
पाहावेना तें—साहवेना तें
"अयाईग !..."
तिट्तिट् तुटलेल्या काळीजतुकड्यांत
अमाप राहिली दयामूर्ति उभी !

डुबुक् डुबुक् डुबुक्
"द्या आई, द्या माई, द्या ताई
द्या मामा, द्या बाबा, द्या तात्या
कच्च्याबच्च्यांचा जुना उतारा
फाटकीतुटकी टोपी एखांदी
बचाला थंडीची अंगी एखांदी
भाकरतुकडा द्या पोटाला......"
—आणि डोंबाऱ्याच्या कटोऱ्यांत पडे
शिळापाका तुकडा
डोंबारणीला फाटकी चोळी
लहानग्या बाळाला
बाळाची अंगी
कुणी दिली दिडकी कनवटीची
आणि कुणी, 'नाहीं' म्हणूनहि म्हणालें
आणि कुणी गेलें मागचे मागें
जवळ येतां मागाया डोंबारी !

—राजा मंगळवेढेकर

श्री. के. वि. गो ड बो ले

# वर्ण व जाती यांची उत्पत्ति आणि प्राचीन इतिहासपूर्व स्वरूप

वर्ण व जाती यांचा प्रारंभ व प्रस्थ मुख्यतः हिंदुसमाजांत दिसून येतें व आजहि त्यांची जन-मनावरील पकड शिथिल झाली आहे असें म्हणतां येणार नाहीं. अर्थात् परिस्थितीमुळें या बंधनाचें दृश्य स्वरूप थोडें पालटलें असेल. परंतु मनुष्य हा बहुधा तत्त्वापेक्षां सोयीकडे पाहून वागणारा असल्यामुळें जातीच्या बाह्य बंधनांना तो हल्लीं थोडी मुरड घालीत असला तरी ती आपली कर्तव्यच्युति आहे असेंच तो मनांत समजतो व प्रसंग अनुकूल असेल तर बोलूनहि दाखवितो. भोंवतालची परिस्थिति प्रतिकूल असेल अशा वेळीं आपली वृत्ति जातिबंधनांनीं संकुचित राहिली नसून विस्तृत मानव्याला मान देणारी व समता-वादी आहे असें दर्शवून स्वतःच तो आपली पाठ थोपटून घेतो व लोकांकडूनहि शाबासकी मिळ-विण्याचा प्रयत्न करतो. अर्थात् हीं सर्व खरेपणाचीं लक्षणें नसून व्यवहारचातुर्याचीं आहेत. म्हणून अपवाद किंवा अत्यंत थोडे लोक सोडले तर बहुसंख्य हिंदु जनता आजहि जातिबंधनातीत नसून जाति-बंधनांतच गुरफटलेली आहे असें म्हणणें प्राप्त होतें. म्हणून वर्ण व जाती यांचा प्रारंभ कसा झाला व त्याची महाभारताच्या काळाच्या अखेर कशी स्थिति होती याचें विवेचन या लेखांत करण्याचें योजिलें आहे.

### वर्ण-जातींना जन्माचें अधिष्ठान

जातिसंस्था व वर्णसंस्था यांतील अधिक जुनी कोणती हा एक वादग्रस्त प्रश्न आहे, व वृक्ष आधीं कीं बीज आधीं या कूटप्रश्नाइतकाच तो कठिण होऊन बसला आहे. परंतु त्याचें उत्तर देण्याचा प्रयत्न करण्याच्या आधीं वर्ण व जाती यांच्या उत्पत्तीचा इतिहास लक्षांत घेणें इष्ट होईल. आपण जगांत नित्य पाहातों कीं, मनुष्यामनुष्यांतला ढोबळ व सहज लक्षांत येणारा भेद हा कातडीच्या रंगाचा होय. यामुळें मराठी इतिहासांत मोंगल लोकांना ते तांबूस-गोरे असल्यानें ‘ ताम्र ’ असें म्हणत. इंग्रज व इतर पाश्चिमात्यांना ‘ गोरे ’ असें आजहि संबोधिलें जातें. तसेंच हबशी व शिद्दी यांना ऐति-हासिक कागदपत्रांत ‘ श्यामल ’ असें उल्लेखीत असत व आजहि नीग्रोंना व आफ्रिकनांना ‘ काळे ’ म्हटलें जातेंच. राहिले जे चिनी, जपानी वगैरे अतिपूर्वेंतील लोक, ते पीत म्हणजे ‘ पिवळे ’ म्हणून प्रसिद्ध झाले. यावरून असें बिनदिक्कत अनुमान काढण्यास हरकत नाहीं कीं, प्रथम ‘ वर्ण ’ शब्द प्रचारांत आला तो गुणांवरून अगर कर्मांवरून नसून कातडीच्या रंगावरून प्रचारांत आला असला पाहिजे. फार पूर्वीं उत्तरेकडील आर्य लोकच एकत्र राहात असत. त्या वेळीं वर्णांवरून एखाद्या मनुष्य-वर्गाचा उल्लेख करण्याचें कारणच पडत नसावें. कारण सगळेच एका गोऱ्या रंगाचे होते. असा एक-वर्ण समाज असतांना वर्णाचा उल्लेख अप्रस्तुतच होता. म्हणून वेदकालीं किंवा वेदपूर्व कालीं समाज एकवर्णच होता असें सूचित करणारीं “ एक-वर्णमिदं पूर्वं विश्वमासीद्युधिष्ठिर ” ( वनपर्व ) या-सारखीं वर्णनें महाभारतांत व इतरत्र मागाहून केलीं गेलीं असावींत. तसेंच भागवतांत “ आदौ कृत-युगे वर्णो नृणां हंस इतीरितः ” म्हणजे, प्रथम कृत-युगांत हंस नांवाचा मनुष्यांचा एकच वर्ण होता असें वचन आहे. आतां हंस हा शुभ्र रंगाचा

असतो हें प्रसिद्धच आहे. यावरून गौरवर्णी आर्य हे एकटेच असतांना त्यांचा समाज एकजात गोऱ्यांचा असावा असा या वचनाचा आशय दिसतो. अनार्य अगर दस्यू हे काळे असत. यामुळें त्यांच्याशीं संबंध आल्यावर गोरे व काळे हे वर्णवाचक शब्द या अर्थानें प्रचारांत आले असावेत. वर्ण या शब्दाची उत्पत्ति व उपपत्ति मुळांत अशा प्रकारची असावी असें वाटतें. यावरून हल्लीं आपण ज्या अर्थानें वर्ण-व्यवस्था यांतील वर्ण शब्द उपयोजितों त्या अर्थानें तो भाषेंत आरंभीं रूढ नव्हता. त्याचप्रमाणें केवळ रंगामुळें जेथवर समाजाला एकवर्ण अगर द्विवर्ण म्हणत, तेथवरहि समाजव्यवस्थेच्या अर्थाची छटा वर्ण शब्दांत आलेली नव्हती. परंतु गोरे आर्य हे सुधारलेले असून जेते होते, यामुळें साहजिकच ते मालक म्हणजे सेव्य बनले व काळे अनार्य हे दास किंवा सेवक बनले. आणि अशा प्रकारें गौरवर्णीयांचीं कर्में निराळीं व कृष्णवर्णीयांचीं निराळीं आपोआपच ठरून गेलीं. तसेंच आनुवंशिकतेनें या दोन वर्गांचे रंग जसे निराळे राहिले त्याचप्रमाणें त्यांचीं कर्मेंहि निराळीं बनलीं. या कारणानें वर्ण हा जसा जन्मावर अवलंबून तसेंच कर्महि जन्मावर अवलंबून असा प्रकार सुरू झाला. आणि जन्मकर्मांतील या साधर्म्या-मुळेंच वर्ण, व जन् म्हणजे जन्मणें या धातूपासून झालेला ' जाति ', हे दोन शब्द विशिष्ट सामाजिक व्यवस्था या एकाच अर्थानें व एकदमच वापरण्यास सुरुवात झाली व दोन्हीहि जन्मावरच अधिष्ठित झाले. या जन्माच्या अधिष्ठानाखालींच वर्ण व जाती यांची विषारी नांगी लपलेली आहे. कारण वर्ण व जाती जर जन्मजात म्हणजे जन्मावर आधारलेल्या नसत्या तर त्यांच्यामुळें आजवर जो अनर्थ झाला आहे व पुढें होण्याचा संभव आहे, तो घडवून आणण्याचें सामर्थ्य त्यांच्या अंगीं कदापि आलें नसतें.

वर्ण चार व जाती अनेक आणि म्हणून त्या वर्णा-नंतर उत्पन्न झाल्या असल्या पाहिजेत ही समजूत बरो-बर नाहीं. कारण चातुर्वर्ण्याची व्यवस्था नांवारूपास व पूर्णत्वास येण्याच्या आधींच समाजाच्या विविध गरजा भागवणाऱ्या लोकांच्या जाती उत्पन्न झाल्या होत्या. ज्येष्ठ व श्रेष्ठ संशोधक व साहित्यिक श्री. नानासाहेब चापेकर यांनींहि प्रस्तुत लेखकास, " वर्णांतून जाती उद्भवल्या असें मला वाटत नाहीं. जाती मूळच्या. वर्ण ही कृत्रिम व्यवस्था जातीवर उभारलेली, ह्या भूमिकेवरून जातीचा विचार केला पाहिजे अशी माझी विचारसरणी आहे " असें लिहिलें होतें, त्याचाहि आशय हाच असावा असें वाटतें. पुढें महाभारतकालीं जातींना चातुर्वर्ण्याच्या चौकटींत बसविण्याचा प्रयत्न भगवान् श्रीकृष्णांनीं केला खरा. परंतु त्यामुळेंहि जातींची वाढ न खुंटतां बेसुमार वाढतच राहिली हा इतिहास पुढें येईलच. परंतु तूर्त एवढें सांगणें इष्ट वाटतें कीं, बापाचेंच कर्म मुलानें करण्याची प्रथा आर्य व अनार्य हे दोनच वर्ण असतांना जी एकदा पडली ती चार वर्ण व अनेक जाती स्थापन होत असतांना व स्थापन झाल्यावरहि चालूच राहिली. वर्णव्यवस्था पक्की होण्यापूर्वीं व्यक्तींचे वर्ण गुणकर्मपरत्वें बदलण्यास वाव होता, असें दिसतें. परंतु गुणकर्मांवर आधारलेली ही वर्ण-व्यवस्था पुढें पुढें अपवादांनींच प्रत्ययास येऊं लागली व फार अल्प काळ टिकली असें दिसतें. अर्थात् " निरवधि " अशा कालाच्या अनिश्चित कालखंडांना लावलेल्या ' दीर्घ ' अगर ' अल्प ' या विशेषणांचा अर्थ संदर्भानुरोधानेंच लावावयाचा हें सांगणें नकोच. तसेंच वर्ण व जाती यांच्या उत्पत्तीची व पुढील प्रगतीची वर केलेली चिकित्सा दीर्घ कालाच्या धुक्यांतून प्रस्तुत लेखकास जें कांहीं दिसूं शकलें त्यावरून व कार्यकारणभाव आणि अनुमान यांच्या आधारानें केलेली आहे. त्यांतील प्रत्येक विधानाला ग्रंथाधार असेल असें नाहीं, हेंहि स्पष्ट करणें इष्ट वाटतें.

## शंबूकाचा वध काय दर्शवितो ?

महाभारतकालींच नव्हे तर रामायणकालींहि वर्ण-व्यवस्था जन्मावर निश्चितपणें प्रस्थापित झाली होती. कोणाहि मनुष्याचा वर्ण अगर त्याची जात ठरविण्याचें गमक जन्माऐवजीं गुणकर्म मानण्याची जी वैकल्पिक तरी प्रथा पूर्वकाळीं अधूनमधून दिसून येत असे, तीहि या दोन्ही महाकाव्यांच्या काळीं जवळ जवळ लुप्त झाली होती. क्वचित् रामायणांत व मुख्यत्वेंकरून महाभारतांत या बाबतींत लवचिकपणा दाखविणारे जे उल्लेख आहेत, ते तत्कालीन परिस्थितीचे द्योतक

नसून भूतकालांतील कल्पनांचे तरी द्योतक असावेत किंवा ते ( wishful thinking ) 'जशी वासना तशी भावना' अशा स्वरूपाचे असावेत. अनुशासनपर्वांत

सर्वोऽयं ब्राह्मणो लोके वृत्तेन तु विधीयते ।

वृत्ते स्थितस्तु शूद्रोऽपि ब्राह्मणत्वं नियच्छति ॥

हें वचन आहे. परंतु हें व अशीं दुसरीं वचनें वाच्यार्थानें घ्यावयाचीं नसून लक्ष्यार्थानेंच घेतलीं पाहिजेत. या व अशा श्लोकांचा अर्थ 'शूद्रहि तत्त्वदृष्ट्या ब्राह्मणांच्या योग्यतेला चढतो' एवढाच; जातिब्राह्मणांत तो सर्वार्थानें म्हणजे व्यवहारतः समाविष्ट होत होता अशी परिस्थिति तत्कालीं होती, असा मात्र नव्हे. ज्याप्रमाणें, गीतेंत

अपि चेत्सुदुराचारो भजते मामनन्यभाक् ।

साधुरेव स मन्तव्यः सम्यग्व्यवसितो हि सः ॥

हें वचन जसें उपदेशपर अगर उपचारपर आहे, तशीच वरील वचनांची स्थिति आहे. इंग्रजींत ज्याप्रमाणें the proof of the pudding lies in the eating, किंवा मराठींत 'कळे संबंधी कीं कळे जेरबंदी' अशा म्हणी आहेत, त्याप्रमाणें या वचनांचा अर्थ प्रत्यक्ष त्या वेळच्या घडलेल्या गोष्टींवरूनच ठरविला पाहिजे.

या दृष्टीनें रामायणांतील शंबूकाची व महाभारतांतील एकलव्याची अशा दोन कथा चिंतनीय आहेत.

श्रीरामप्रभु राज्य करीत असतां एक दिवस एक ब्राह्मण आपला मेलेला बालक घेऊन राजद्वारीं उपस्थित झाला व " आपल्या मुलाचा अकालमृत्यु हा निःसंशय राजाच्या अपराधाचें फळ आहे ( रामस्य दुष्कृतं किंचिन्महदस्ति न संशयः ). तेव्हां या अपराधाचें निराकरण करून हा बालक जिवंत होऊं दे, नाहीं तर आपण सपत्नीक राजद्वारांत मृत्यूला कवटाळूं" अशी त्या ब्राह्मणानें धमकी दिली. तेव्हां रामानें आपले वसिष्ठ वामदेवादि सगळे अष्टप्रधान किंवा मंत्री बोलावले व त्यांनीं रामाला " तुझ्या राज्यसीमेंत कोणी तरी हीनवर्ण मनुष्य मोठें तप करीत असला पाहिजे ( हीनवर्णो नृपश्रेष्ठ तप्यते सुमहत्तपः ) म्हणून आपल्या राज्यांत सर्वत्र फिरून ज्या ठिकाणीं असा अधर्म (!) चालला असेल त्याचें निराकरण कर ( दुष्कृतं यत्र पश्येथास्तत्र यत्नं समाचर । ) व असें केलेंस म्हणजे धर्मवृद्धि (!) होईल व लोकांची आयुर्मर्यादा वाढेल ( एवं चेद्धर्मवृद्धिश्च नृणां चायुर्विवर्धनम् । ) आणि या बालकालाहि जीव लाभेल ( भविष्यति नरश्रेष्ठ बालस्यास्य च जीवितम् । ) " असा एकमुखानें सल्ला दिला. रामानेंहि धनुष्य, भाता, तलवार हें साहित्य घेऊन पुष्पकविमानांत बसून आपल्या राज्याच्या चारी दिशा धुंडाळल्या. तेव्हां विंध्यपर्वताच्या दक्षिण दिशेला शैवल नांवाच्या पर्वताजवळ मोठें तळें होतें तेथें स्वतःला अधोमुख टांगून घेऊन तप करीत असलेला एक तपस्वी रामाला दिसला. त्याला रामानें म्हटलें : " हें दुर्धर तप तूं कशाकरितां करीत आहेस ? तूं ब्राह्मण, क्षत्रिय, तृतीयवर्णी वैश्य अगर शूद्र आहेस, हें सत्यवचनी होऊन ( 'सत्यवाग्भव' ) मला सांग. मी दाशरथी राम ( कौतूहलात्त्वां पृच्छामि ) केवळ जिज्ञासेनें तुला विचारीत आहें. " त्यावर त्या तपस्व्यानें मी " शूद्रयोनींत जन्म पावलों ( शूद्रयोन्यां प्रजातोऽस्मि ) व याच देहानें देवत्व मिळविण्याची इच्छा करीत आहे आणि शम्बूक हें माझें नांव आहे " असें सर्वस्वीं सत्य उत्तर दिलें. त्याबरोबर आपल्या चकाकणाऱ्या तलवारीनें रामानें तत्काल त्याचा शिरश्छेद केला व तो होतांच आतां शूद्र आपल्यांत म्हणजे देवसमाजांत येऊन बसण्याचा संभव दूर झाला, म्हणून इंद्र व अग्निसहित देव रामाचा जयजयकार करूं लागले. तेव्हां 'ब्राह्मणबालकाला जीवदान द्या' असा रामानें त्याजपाशीं वर मागितला असतां 'तो बालक आधींच सजीव होऊन आपल्या बांधवांना भेटला आहे' असें देवांनीं रामाला सांगितलें. वरील सर्व संस्कृत उतारे वाल्मीकिरामायणाच्या उत्तरकांडांतल्या ७४, ७५ व ७६ व्या सर्गांतले आहेत. 'राम हा राजा आहे व खड्ग घेऊन आपला वध करावयाला आला असला पाहिजे', हें शंबूकानें ओळखलें नसेल, हें शक्य नाहीं. असें असून त्यानें मात्र प्राणसंकटाच्या वेळीं 'असत्य भाषण पाप नाहीं' या मनुप्रणीत धर्माचा आधार न घेतां, सत्य भाषण केलें व ज्या रामाची 'रामो द्विर्नाभिभाषते' अशी कीर्ति गात, त्या सत्यवचनी रामानें मात्र "मी कौतुका-










नें वा जिज्ञासेनें प्रश्न विचारतों " असें फसवें भाषण करून शम्बूकाचा प्राण घेतला. आणि असें असूनहि राम हा अखिल देव-ब्राह्मणांना वंद्य असा धर्मशील क्षत्रिय राजा ठरला व प्राणात्यय होईल हें माहीत असूनहि जो असत्य बोलला नाहीं, तो तपस्वी शम्बूक धर्मघातकी व अतएव वधाला पात्र ठरला, ही गोष्ट काय दर्शविते? यावरून विश्वामित्र ब्रह्मर्षि झाला व त्रिशंकु हा चांडाल राजा सदेह स्वर्गाला गेला, या रामायणांत सांगितलेल्या कथा तत्पूर्वकालीन व अपवादात्मक होत्या, हें उघडच दिसतें.

## एकलव्यावर केवढा घोर अन्याय ?

आतां महाभारतांत तर, " जन्मापेक्षां गुणाला मान द्यावा, ही बंडखोरीची घोषणा अट्टाहासानें केली असून तिनें जुन्या समजुतीला चांगला धक्का दिला " असें श्री. महादेवशास्त्री दिवेकर हे आपल्या 'नवा हिंदुधर्म' या पुस्तकांत लिहितात तें खरें आहे व त्यांनीं तत्प्रीत्यर्थ उद्धृत केलेलीं महाभारतान्तर्गत वचनेंहि त्यांच्या या म्हणण्याला पुष्टि देतात, यांत शंका नाहीं. परंतु आम्हीं वर म्हटल्याप्रमाणें तीं पूर्वकालाचीं द्योतक, उपदेशपर अथवा उपचारपर असावींत. कारण खुद्द महाभारतकाळांतील एकलव्याची गोष्ट पाहा. कौरवपांडव हे धनुर्विद्या द्रोणाचार्यांपाशीं शिकत असतां एकलव्य नांवाचा निषादराजाचा पुत्र त्यांजकडे विद्यादान मागावयास गेला असतां, तो हीनवर्ण म्हणून त्याला विद्यादान करण्याचें द्रोणाचार्यांनीं नाकारलें. तेव्हां एकलव्यानें द्रोणाचा मातीचा पुतळा बनवून त्यास गुरु कल्पून धनुर्विद्या आत्मसात् करून घेतली. इतकी कीं, शिकारींत वाट चुकलेला राजपुत्रांचा कुत्रा त्याच्या अंगावर भुंकूं लागला असतां त्याच्या तोंडाला इजा न करतां अलगद त्यानें बाणांची एक जुमडी, त्याला जबडा मिटण्यास देखील अवकाश न देतां नेम मारून भात्यांत बाण भरल्याप्रमाणें, त्याच्या ( कुत्र्याच्या ) तोंडांत ठेवून देऊन त्याचें भुंकणें बंद केलें. ती त्याची धनुर्विद्येंतील आश्चर्यकारक पारंगतता पाहून ते राजपुत्र लज्जित झाले व त्या योगानें अर्जुनाला एकलव्याचा मत्सर वाटूं लागला व तो द्रोणाचार्यांना म्हणूं लागला कीं, " गुरुजी, आपण धनुर्विद्येंत माझी कोणीहि बरोबरी करणार नाहीं, असें जें म्हणाला होतां त्याचें हेंच फल काय, कीं आपलाच शिष्य म्हणविणारा एकजण व तोहि हीनवर्ण असलेला, माझ्यापेक्षां वरचढ होऊं दिलांत ?" तें ऐकतांच द्रोणाचार्य एकलव्याकडे गेले. त्यांना आलेले पाहातांच एकलव्यानें आपल्या गुरुदेवतेचें स्वागत व पूजा केली. तेव्हां गुरुमहाराजांनीं कावेबाजपणानें त्याजपाशीं गुरुदक्षिणा मागितली व ती त्यानें मोकळ्या व शुद्ध मनानें देण्याची तयारी दर्शवितांच त्याच्या हाताचा उजवा अंगठा दक्षिणा म्हणून मागितला. तथापि ते क्रूर शब्द ऐकून न कचरतां एकलव्यानें आपला तो अंगठा तत्काळ तोडून गुरूला दिला. कविवर्य मोरोपंतांनीं त्या प्रसंगाचें सर्वच वर्णन आर्याभारतांत बहारीचें केलें आहे. ते म्हणतात कीं, "तो एकलव्य,

साहे छळ आनंदें, वाहे अंगुष्ठ, वरि न तो पाहे ।  
राहे उगाचि;जाणों, देउनि अत्यल्प लाजला आहे ?॥"

द्रोणाचार्य जी धनुर्विद्या आपल्या शिष्यांना शिकवीत असत, ती तत्कालीं धनुर्वेद या मोठ्या नांवानें उल्लेखिण्याची पद्धत होती. केवळ वेद हें आडनांव ज्या कलेला लागलेलें होतें, ती कलादेखील ब्राह्मण व क्षत्रिय जातींच्या बाहेर जाऊं नये म्हणून व येन केन प्रकारेण क्षत्रिय राजपुत्रांना इतरांहून अधिक मोठेपणाला चढविण्यासाठीं, कलेंत व गुणांत त्यांच्याहून वरचढ अशा निषाद राजपुत्रावर, धर्मज्ञ म्हणून गाजलेल्या द्रोणाचार्यांसारख्या श्रेष्ठ ब्राह्मण आचार्यांनीं केवढा अन्याय केला ! वर्णवैषम्य व जातिद्वेष यांचें अधिक शोचनीय असें दुसरें उदाहरण आढळेल का ? द्रोणाचार्य यांची सर्वांशीं 'सम' बुद्धीनें वागण्याची वृत्ति परजातीय शिष्य भेटतांच कशी लोपली, याचें वर्णन पंतांनीं केलें आहे :

" सर्वत्र समें सदयें गुरुनें त्या मात्र एकलव्याला ।  
केलें नाहीं, जैसें विधिनें श्रुतिपात्र एकल व्याला ॥"

( अर्थः—ब्रह्मदेवानें एकट्या सापाला ज्याप्रमाणें श्रुति म्हणजे कान हें इंद्रिय दिलें नाहीं, त्याप्रमाणें सदय व सर्वत्र समवृत्तीच्या द्रोणाचार्यांनीं त्या एकलव्याला मात्र श्रुति म्हणजे वेद—धनुर्वेद—ग्रहणाला पात्र ठरविलें नाहीं.) वास्तविक धनुर्विद्या हा पिढ्यानुपिढ्या निषादां-








# वर्ण व जाती यांची उत्पत्ति आणि प्राचीन इतिहासपूर्व स्वरूप

चा जन्मजात धंदा. त्यांत तर एकलव्य क्षत्रियांपेक्षां शतपट वरचढ होताच. एवढेंच नव्हे, तर आपल्या अंगच्या सदाचार, सत्य व औदार्य या गुणांनीं तो ब्राह्मणांहूनहि श्रेष्ठ होता. असें असून एकलव्याला जन्मजात ब्राह्मण अगर क्षत्रिय वर्गांत समाविष्ट करून घेण्याऐवजीं त्याचा छळ व निःपात करण्यांत आला. शम्बूकाची तीच अवस्था. यावरून उच्चवर्णीयांचा रामायण–व–महाभारतकालीं हा प्रतिष्ठित धंदाच होऊन बसला होता, हें या दोघांच्या गोष्टीवरून स्पष्ट आहे. फार काय, दुर्योधनमित्र अंगराज कर्णाला देखील–त्याची जन्मकथा सर्वांना आंतून विदित असूनहि–कधीं जन्मजात क्षत्रियाचें पद लाभलें नाहीं. व त्याला त्याचे शत्रूच नव्हेत, तर स्वपक्षीय देखील जातीवरून हिणवीत. 'वेणीसंहारां'त अश्वत्थाम्यानें अशाच प्रकारें हिणविलें असतां–

"सूतो वा सूतपुत्रो वा यो वा को वा भवाम्यहम्।
दैवायत्तं कुले जन्म मदायत्तं तु पौरुषम् ॥"

असें तेजस्वी उत्तर कर्णानें दिलें खरें. पण दैवायत्त जन्माऐवजीं स्वायत्त गुणांना मान देण्याची वृत्ति त्या कालांत राहिली होती कोठें? हीनवर्ण लेखले जाणारे वर्ग पौराणिक काळीं बंड न करतां हें सर्व मुकाट्यानें सोशीत, याचें कारण धार्मिक दास्य हें होय, हें खरें असलें तथापि अशा सूक्तासूक्त मार्गांनीं आपल्या वर्णानें वर्चस्व टिकविण्याचे प्रयत्न, ज्याचें रामराज्य आजहि आदर्श मानलें जातें, त्या प्रत्यक्ष श्रीरामासारख्या जगद्वंद्य व देवरूप पुरुषानें देखील करावेत, ही मोठी शोचनीय गोष्ट होय. त्याच्या जीवनांतील शम्बूकप्रसंग अशा रीतीनें लोकांच्यापुढें मांडणें, हें कदाचित् लेखकाच्या नास्तिकपणाचेंच नव्हे, तर विकृत मनोवृत्तीचेंहि लक्षण वाटेल. परंतु प्राचीन वा अर्वाचीन लोकस्थितीच्या इतिहासाचा अभ्यास करणारानें एका सत्यसंशोधनाकडेच दृष्टि ठेवली पाहिजे. शिवाय राम अगर द्रोण या व्यक्तींचे हे गुणदोष नसून, त्या व्यक्ती त्या काळच्या चांगल्यावाइटांचीं प्रतीकें होत्या, हें लक्षांत ठेवलें पाहिजे. त्यांच्या अंगीं वैयक्तिक रीत्या दैवी गुणांचें फार मोठें आधिक्य होतें व त्यामुळें त्यांचे असे दोष "एको हि दोषो गुणसंनिपाते निमज्जतीन्दोः किरणेष्विवाङ्कः।" या न्यायामुळें झांकूनहि गेले असतील. पण मग त्यांच्या एकाद्या दोषावर आतां भर देऊन तो लोकांच्या निदर्शनास आणण्यांत हेतु कोणता? याला उत्तर इतकेंच कीं, श्रेष्ठ पुरुष देखील भलत्याबुऱ्या धर्मकल्पनांचे दास होऊं शकले. म्हणून त्या धर्मकल्पना पारखून घेतल्याखेरीज यापुढें तरी त्यांना चिकटून राहून आपण हिंदूंनीं आत्मघात करून घेऊं नये, एवढेंच दर्शविण्याचा हेतु आहे. शिवाय कोणत्याहि एका वर्णाचेच लोक या धर्मकल्पनांच्या आहारीं जाऊन दुसऱ्या वर्णाच्या लोकांचा छळ करीत असें नसून, सर्वच वर्णांचे लोक असें वागत. परंतु वरिष्ठ वर्णाचे लोक अधिक शहाणे व अधिक सत्ताधारी असल्यानें त्यांना असें वागण्याची संधि अधिक मिळे एवढेंच. ज्याप्रमाणें धनुर्विद्येला धनुर्वेद म्हणून ती एक धार्मिक बाब करण्यांत आली, तीच पद्धत इतरहि अनेक बाबतींत स्वीकारण्यांत आली. वर्णव्यवस्था व जातिव्यवस्था ही वास्तविक सर्वस्वीं सामाजिक बाब असून तीहि धर्माच्या कक्षेंत घालण्यांत आली व त्यामुळेंच त्या व्यवस्थांच्या रक्षणार्थ योजावे लागणारे बरेवाईट उपायहि धार्मिक कर्तव्यें समजण्यांत येऊं लागले. आणि शम्बूकवध व एकलव्याचें अंगुष्ठछेदन यांसारखे अघोरी उपाय त्यांवर धार्मिकतेचा छाप पडल्यामुळेंच समाजांत प्रतिष्ठा पावले व चिरस्थायी झाले.

## गुणांना पूजिणारा उपनिषत्काल

रामायणमहाभारतांच्या आधींच्या वैदिक व औपनिषदिक काळीं माल मनुष्याची किंमत जन्मावर आधारलेल्या वर्णापेक्षां त्याच्या गुणांवरून होत असे, असें दर्शविणारे दाखले आहेत. 'सत्यकाम जाबाल' नावाच्या मुलानें आपल्या जबाला–नामक आईला विचारलें कीं, "मला ब्राह्मण छात्राची दीक्षा घेण्याची इच्छा आहे. तरी माझा जन्म कोणत्या कुळांत झाला तें सांग." त्यावर तिनें उत्तर दिलें कीं, "मी तरुण दासी असतांना अनेक घरीं राहिलें व तशा परिस्थितींत तूं मला झालास. म्हणून तुझ्या 'सत्यकाम' या व्यक्तिनामापुढें तूं माझा पुत्र म्हणून 'जाबाल' हें कुलनाम मीं जोडलें. तुझ्या वडिलांचें नांव वरील कारणानें मलाहि सांगतां येण्यासारखें नसल्यानें, त्याचा उल्लेखच तुझ्या नांवांत आणला नाहीं." असें आईनें सांगितल्यावर तो मुलगा








एका ऋषीकडे गेला व " मला ब्रह्मचर्याची दीक्षा द्या " असें त्याला म्हणाला. ऋषीनें 'तूं कोणत्या कुळांत जन्मलास ?' असें विचारतांच त्या मुलानें आईनें सांगितल्याप्रमाणें खरी हकीकत ऋषीला सांगितली. तेव्हां, " इतकें खरें बोलतोस त्यावरून तूं ब्राह्मणच आहेस. " असें म्हणून त्यास ऋषीनें तत्काल दीक्षा दिली. आतां ही गोष्ट किती मननीय आहे ! वर्णाचेंहि तर नांवहि नाहीं, बापाचेंहि नाहीं. आई अविवाहित दासी व त्यामुळें अनेक मालकांच्या विषयवासनेस बळी पडलेली. परंतु जन्म हा दैवायत्त, सबब त्या मुलाची किंमत फक्त त्याच्या अंगच्या गुणांवर ठरविणारे वेदकाल व उपनिषत्काल कोणीकडे व सत्यासाठीं मृत्यु व लुळेपण पत्करणाऱ्या हीनवर्णांना धर्माच्या नांवावर दूर लोटणारा व त्यांच्यावर अत्याचार करणारा तदनंतरचा रामायण-व-महाभारतकाल कोणीकडे, असें मनांत आल्याशिवाय राहात नाहीं.

## श्रीकृष्णाचें पुरोगामित्व

अर्थात् वर वर्णन केलेली रामायण-महाभारतकालीन स्थिति उच्चवर्णीयांपैकीं कोणालाच अयोग्य वाटत नसे, असा मात्र वरील लिहिण्याचा अर्थ नाहीं. महाभारतकालीं, ही स्थिति दूर व्हावी व गुणकर्मानुसार शूद्र देखील ब्राह्मणत्वाप्रत पोंचावा, असें पुष्कळांना वाटत असावें, असें वर दर्शविलेंच आहे. परंतु भगवान् श्रीकृष्णाला याविषयींची टोंचणी सर्वांहून अधिक लागली असली पाहिजे. त्या पुरुषाची योग्यता व सुधारणा घडवून आणण्याची तळमळ आणि सामर्थ्य असामान्य असल्यानें त्यानें चातुर्वर्ण्याची जन्मावर घसरलेली गाडी पुन्हां गुणकर्मांच्या रुळांवर आणून चालूं करण्याचा फार जोरदार प्रयत्न केला. गीताकाल फार जुना झाल्यानें आतां तो ग्रंथ व त्याचा प्रणेता श्रीकृष्ण हा फार सोवळा व सनातनी वाटतो. परंतु तत्कालीं श्रीकृष्ण हा मोठा क्रांतिकारक समाजसुधारक गणला जात असला पाहिजे; इतका कीं, 'त्रैगुण्ययुक्त वेद काम्यकर्मकाण्डमय असल्यानें त्यांच्या नादीं न लागतां निस्त्रैगुण्य हो' असा उपदेश अर्जुनाला करण्यापर्यंत त्याची मजल गेली आहे. 'वेदवादरतां'ची अशी अवस्था त्यानें केल्यानें वेदांच्या सर्वोच्चपणाला यत्किंचित्सुद्धां उणेपणा येऊं नये म्हणून गीतेच्या श्लोकांचे अर्थ लावतांना, ते वेदानुकूल लावण्याची शिकस्त अनेक भाष्यकारांनीं अनेक ठिकाणीं केली आहे, हीहि गोष्ट श्रीकृष्णाच्या विचारांचें पुरोगामित्वच अप्रत्यक्षपणें सिद्ध करते. वेदांच्या पलीकडे जगांत कांहींहि नाहीं, ते अपौरुषेय आहेत व सर्व ज्ञानाची समाप्ति तेथें झाली, असें मानणारांपैकीं अर्थातच श्रीकृष्ण नव्हता. तसेंच,

> सर्वभूतस्थमात्मानं सर्वभूतानि चात्मनि ।
> ईक्षते योगयुक्तात्मा सर्वत्र समदर्शनः ॥

या समदृष्टीच्या व आत्मौपम्याच्या तत्त्वज्ञानाचा तो भोक्ता होता. रामायणांतहि 'जगांत पुरुषोत्तम कोण ?' असा वाल्मीकींनीं नारदांना प्रश्न करतांना 'चरित्रेणच को युक्तः सर्वभूतेषु को हितः ।' असें विचारलें आहे व नारदांनींहि " सर्वसमः " असें पुरुषोत्तम रामाचें वर्णन केलें आहे. महाभारतांत तर या 'सर्वभूतहिते रतत्व " तत्त्वाचा फारच जोराचा पुरस्कार केलेला आहे. इतका कीं, सर्व भूतांचें हित तेंच सत्य, 'यद् भूतहितमत्यन्तमेतत्सत्यं मतं मम ।' अशी शांतिपर्वांत सत्याची व्याख्या करण्यापर्यंत मजल गेलेली आढळते. वनपर्वांतील 'यद् भूतहितमत्यन्तं तत्सत्यमिति धारणा', 'अहिंसा सत्यवचनं सर्वभूतहितं परम्' हीं वचनें लोकमान्य टिळकांच्या गीतारहस्यांत उद्धृत केलेलीं आहेत. 'Greatest good of the greatest number', 'पुष्कळांचें पुष्कळ हित' या तत्त्वज्ञानाशीं वरील तत्त्वाचें साम्य असून त्यापेक्षांहि तें श्रेष्ठ आहे. लोकमान्यांनीं 'गीतारहस्यां'त " माणुसकी किंवा मनुष्यपण कशांत आहे याचा सूक्ष्म विचार करूं लागलें म्हणजे याज्ञवल्क्यानें म्हटल्याप्रमाणें 'आत्मा वा अरे द्रष्टव्यः' हा प्रश्न साहजिकरीत्या उत्पन्न होतो. नीतिशास्त्राचें विवेचन करणाऱ्या एका अमेरिकेंतील ग्रंथकारानें या समुच्चयात्मक मनुष्यपणाच्या धर्मासच 'आत्मा' ही संज्ञा दिलेली आहे " असें लिहिलेलें आहे. रामायण व विशेषतः महाभारत यांत मान्यता पावलेल्या व मानवधर्माचें प्रधान अंग म्हणून श्रीकृष्णानें पुरस्कारलेल्या 'सर्वत्र समदर्शन' तत्त्वाशीं वर्णांचे व अर्थातच








जातीचें जन्माधिष्ठितत्व विसंगत किंबहुना विरोधी होतें. यामुळें तो विरोध नष्ट करण्याचा चंग बांधूनच त्यानें अगदीं असंदिग्ध शब्दांत,

' चातुर्वर्ण्यं मया सृष्टं गुणकर्मविभागशः । '

अशी महत्त्वाची घोषणा केली व चातुर्वर्ण्याला गुणकर्माच्या सिंहासनावर आरूढ करण्याचा प्रयत्न केला.

### श्रीकृष्णाचीं वचनें उपचारपर ठरलीं !

परंतु गुणकर्म हें तत्त्व म्हणून कितीहि श्रेष्ठ व आकर्षक असलें, तरी तपशिलाच्या दृष्टीनें कृतींत आणावयास तें फार कठिण होतें. कारण पहिली गोष्ट अशी कीं, समाजांतील प्रत्येक व्यक्ति ही गुणकर्मदृष्ट्या कोणत्या वर्णाची हें ठरविण्याचा अधिकार कोणाकडे? व्यक्तीच्या कोणत्या वयांत हें ठरवावयाचें ? तेथवर त्याला कोण समजावयाचें ? वर्ण हा एकदांच ठरावयाचा का व्यक्तीच्या जीवनांत पुनः पुन्हां त्याचे वर्ण सरड्याच्या रंगाप्रमाणें बदलावयाचे ? पण गीतेंत अगर इतरत्र कोठेंहि या व अशा अडचणी सोडविण्याबाबत कांहींहि सोय लावलेली दिसत नाहीं. शिवाय अशी कांहीं सोय लावली असती तरीहि, समाजांतील प्रत्येक व्यक्तीची अशा प्रकारें छाननी व तपासणी करणें व मग त्या व्यक्तीचा वर्ण निश्चित करणें या गोष्टी स्वभावतःच अव्यवहार्य व अशक्य होत्या. यामुळें श्रीकृष्णासारख्या एवढ्या मोठ्या अवतारी पुरुषानें एवढा महान् प्रयत्न करूनहि वर्ण व जाती या जन्माचें अधिष्ठान सोडून गुणकर्मावर कदापि अधिष्ठित होऊं शकल्या नाहींत. याबाबतचीं श्रीकृष्णाची सर्व वचनें याच प्रकारच्या इतर उक्त्यांप्रमाणें उपदेशपर व उपचारपरच होऊन राहिलीं. यामुळें चातुर्वर्ण्य ही श्रीकृष्णप्रणीत योजना असल्यानें ती अत्युत्तम व जगांत अप्रतिम अशी समाजव्यवस्था होती, असें मानणारे पंडित कधीं श्रीकृष्णाच्या अवतारीपणाच्या कल्पनेमुळें भारले गेल्यानें, कधीं त्याच्या विश्वरूप दर्शनाच्या सामर्थ्यानें दिङ्मूढ झाल्यानें, कधीं त्याच्या डोळे दिपविणाऱ्या कर्मयोगपर, प्रवृत्तिमार्गपर, ज्ञानयोगपर, संन्यासपर वा अनासक्तियोगपर तत्त्वज्ञानानें मोहित होऊन गेल्यानें असें म्हणत असावेत, असें वाटतें. अनेक पाश्चात्य पंडितांनीहि हीच री ओढलेली दिसते. पण गुणकर्माधिष्ठित चातुर्वर्ण्य हें व्यवहारांत कधीं उतरूं शकलें नाहीं व उतरणें शक्य नव्हतें, ही गोष्टच त्यांच्या लक्षांत आलेली नव्हती. यामुळें चातुर्वर्ण्य तेवढें राहिलें, पण तें गुणाकर्माऐवजीं पूर्ववत् जन्मावरच आरूढ होऊन राहिलें. चातुर्वर्ण्याची प्रतिष्ठापना होण्यापूर्वीच अशा रीतीनें अनेक जाती अस्तित्वांत आल्या होत्या व गीताकालीं गुणकर्माधिष्ठित चार वर्णांच्या चौकटींत त्यांना आणण्याचा प्रयत्न यशस्वी न झाल्यानें, जातींची संख्या एकसारखी वाढतच गेली. जन्माच्या अन्याय्य अधिष्ठानाबरोबरच उचनीचपणाचें घातुक तत्त्वहि त्यांत समाविष्ट झालें, हें वर दाखविलेंच आहे. खरें म्हणजे चातुर्वर्ण्याचें उच्चाटन करून वेदकालीन वा वेदपूर्वकालीन एकरंगी नव्हे तर एकवर्ण व एकजिनसी समाज स्थापन करणें हाच तर्कशुद्ध, व्यवहार्य, समताप्रस्थापक व सर्वभूतहितकारक असा मार्ग होता. परंतु तो स्वीकारला न गेल्यानें पौराणिक कालांतल्या प्रमाणेंच पुढील सर्व ऐतिहासिक व आधुनिक कालांतहि पूर्वीची अनर्थपरंपरा अधिकच तीव्रपणें चालू राहिली. तिचा त्रोटक इतिहास व तपशील, तसेंच ती थांबविण्याच्या कांहीं प्रयत्नांची माहिती या गोष्टी स्वतंत्र लेखाचाच विषय होत.

---

## आपली सावली

एका कोल्ह्यानें सूर्योदयाच्या वेळीं आपल्या सावलीकडे पाहिलें व तो स्वतःशींच म्हणाला : " आज दुपारच्या जेवणाला मला सबंध उंटच लागणार ! "—आणि सारी सकाळ त्यानें उंटाचा शोध करण्यांत घालविली. परंतु दुपारच्या वेळीं जेव्हां त्यानें पुन्हां आपल्या सावलीकडे पाहिलें तेव्हां तो म्हणाला : " एक उंदीरसुद्धां पुरेसा होईल मला ! "

—खलील जिब्रान, ' वेडा ' ( अनु० श्रीपाद जोशी )








श्री. दुर्गा भागवत

# कुमारिकेचें कोडें

विवाहजन्य संस्कृतींतून जर सर्वांत मोठें कोडें कोणतें निर्माण झालें असेल, तर तें निष्कलंक कौमार्याचें आणि पर्यायानें आजन्म अविवाहितेचें. कुमारिकेकडे, विशेषत: प्रौढ कुमारिकेकडे बघण्याची बहुतेकांची दृष्टि (त्यांतल्या त्यांत पाश्चात्त्यांची) असमंजस असते. अगदीं एकांगी व्यवहाराकडेच ती रोखलेली असते. कौमार्याची सूक्ष्म पण नाजूक पारख तिला होत नाहीं.

कौमार्याची कल्पना ही मूलत: अतिशय सुंदर आणि स्त्रीजातीचें परम सौकुमार्य आणि निर्माणक्षमता व्यक्त करणारी आहे. पण गोऱ्या पदार्थविज्ञानी संस्कृतीच्या सहवासानें आमची ही मूळ कल्पना साफ बदलून गेली आहे. एकीकडे पारंपरिक प्रथेंतले युगानुयुगींचे अंधुक संस्कार आणि एकीकडे या संस्कारांनां पराजित करूं पाहणारे संपूर्ण भौतिक संस्कार—या दोहोंची रस्सीखेंच भारतांतल्या प्रत्येक विचारवंताच्या मनांत होत असते. लोकहितवादी, राजारामशास्त्री भागवत, राजवाडे, गांधीजी, डॉ. केतकर यांच्यासारखे कांहीं तत्त्वदर्शी पण व्यवहारपट्ट लोक मात्र अपवादादाखल या कुचंबणेंतून थोडेसें मार्गदर्शन करूं शकतात. तें असो. सांगायचा मुद्दा असा कीं, कुमारिकेच्या बाबतींतला भारताच्या धुळींधुळींतून उत्पन्न झालेला नैसर्गिक पाठ आम्ही आज विसरून गेलों आहोंत. तोच विसरलेला पाठ आज मी थोडासा आठवतें आहे.

युरोपियन राष्ट्रांचा इतिहास (एक ग्रीस सोडून) प्रारंभापासूनचा आतांपर्यंत पाहिला, तर तेथें कोणत्या ना कोणत्या रीतीनें युद्धाचें विकट स्वरूप अंतरा-अंतरानें प्रगट होत राहिलें आहे. त्यामुळें पौरुषाची आणि पुरुषांची मध्ययुगापासूनच बेसुमार खच्ची झाली. स्त्रियांची आणि त्यांतल्या त्यांत अविवाहितांची संख्या वाढली. आतां तर ती संख्या बेसुमार फुगली आहे. या स्त्रियांचें स्त्रीत्व ही एक लज्जेची बाब होऊन बसली आहे. जर्मनी, इंग्लंड व अमेरिकेचेंच उदाहरण घ्या. युरोपांत स्कँडिनेव्हिया काय तो बचावला आहे. बाकीच्या साऱ्या राष्ट्रांची नीति धोक्यांत आहे.

अनैसर्गिक परिस्थितीविरुद्ध निसर्ग हा नेहमींच बंड पुकारीत असतो. मध्ययुगापासून पाहा, युरोपांत पुरुषी शक्ति असलेल्या आजन्म कुमारिका, पुरुषांची संख्या कमी झाल्याबरोबर, घराघरांतून उत्पन्न झाल्या. काहींनीं कॉन्व्हेंटची (मठाची) वाट धरली, तर बहुतेकांनीं पुरुष नसल्यामुळें रिकामीं झालेलीं कार्यांचीं सर्व क्षेत्रें व्यापलीं. नैसर्गिक निर्मितीचें कार्य बंद झाल्यामुळें या स्त्रियांनीं आपली सारी निर्माणशक्ति मोठ्या प्रमाणांत आजन्म कार्यांत ओतली. आणि ती ओततां-ओततां या स्त्रिया हळूहळू विकृत होत गेल्या आणि पुरुषांच्या व समाजाच्या चेष्टेचा कायमचा विषय झाल्या. पाश्चात्त्य देशांत गेल्या दोन युद्धांत असें एकहि कठिण काम नाहीं कीं, तें स्त्रियांनीं यशस्वितेनें पार पाडून दाखविलें नाहीं. विज्ञानाच्या क्षेत्रांत पुरुषांप्रमाणें स्त्रियांनीं आपलें सामर्थ्य दाखविलें. एवढेंच नव्हे, तर अतींद्रिय असें सामर्थ्यहि स्त्रियांनीं आत्मसात् केलें; पण तें स्त्रीत्वाचा होम करून.

युद्धजन्य परिस्थितीनें निर्माण केलेली विकृत स्त्रीच्या रूपानें वावरणारी ही दगडी पुरुषी शक्ति युरोपांत सारखी फैलावत होती. गेल्या शतकांतच



अनुक्रमणिका








या शक्तीबद्दल इतकी घृणा पाश्चात्य समाजांत निर्माण झाली कीं, त्यामुळें शांततावाद्यांची, मिलस्पेन्सर-सारख्या संयमी विद्यासेवकांची प्रथा अस्तित्वांत आली. स्त्रीरुपांत वावरणाऱ्या परंतु सर्वथा कर्मशाली अशा या शक्तीचें निरोधन या खऱ्या बुद्धिशाली पुरुषी शक्तीनें केलें. जसजसें हें पुरुषांचें बळ फोंफावूं लागलें, तसतसें ( जरी स्त्रियांचीं कार्यक्षेत्रें कायम राहिलीं तरी ) स्त्रियांचें बौद्धिक बळ, समूहानें पाहिलें असतां, कमी पडूं लागलें. व्यक्ति या दृष्टीनें स्त्री कुठें चमके तेवढीच. स्त्रियांबद्दलचा अनादर वाढतच होता. त्याचें मोठें उदाहरण म्हणजे ऑक्स्फर्ड व केंब्रिजसारख्या विद्यालयांच्या चालकांनीं आतांपर्यंत बुद्धिसंपन्न, शास्त्रज्ञ स्त्रियांनाहि पदवीचा अधिकार न देतां बुद्ध्या डांबून ठेवलें !

यामुळें अविवाहित स्त्रियांचा सामाजिक दर्जा आणखीच हिणकस झाला. आणि त्यांतून ' जीर्ण कुमारिका ' ( old maid ) ही अविवाहितां-बद्दलची मोठी शिवी निर्माण झाली. सक्तीचें कौमार्य आणि मोठ्या कार्याला निरलस वाहून घेतां यावें म्हणून स्वखुशीनें पत्करलेलें कौमार्यव्रत, या दोन्ही अवस्थांचें समतोल परीक्षण तिथल्या समाज-शास्त्रज्ञांनाहि पेलेनासें झालें. मग इतरांची काय कथा ? अर्थात् समाजाच्या अवहेलनेस पात्र झालेल्या या स्त्रियांत सर्व प्रकारच्या मानसिक विकृती शास्त्रज्ञांना दिसून याव्या, यांत नवल तें काय ? परंतु साम्राज्य-शाहीचा जगभर यशस्वी पाया घालतांना धूर्त पाश्चात्यांनीं या स्त्रियांची कार्यक्षमता मिशनरी कामांच्या निमित्तानें लोकसेवेच्या नांवाखालीं जित देशांत सतत पेरती ठेवली. त्यामुळें या दुर्दैवी स्त्रियांच्या वंचित आयुष्याची कहाणी कळण्यापूर्वीच त्यांच्या कार्यतत्परतेची छाप मात्र आमच्यावर पडली. कांहीं सुधारकांनीं या स्त्रियांचा आदर्श पुढें ठेवून बालविवाहाचें समूळ उच्चाटण करण्याचा चंग बांधला. या विचारप्रणालीमुळें आपल्याहि समाजांत बाल-विधवा व कुमारिका, सार्वजनिक कार्यासाठीं आयुष्य वेंचण्यास तयार अशा, तुरळक तुरळक दिसूं लागल्या. कार्याकरितां आजन्म अविवाहित राहाणाऱ्या स्त्री-पुरुषांची संख्या वाढणार, अशीं स्पष्ट लक्षणें आगर-करांनंतर दिसूं लागलीं. त्यांतील कांहीं मंडळी वय उलटून गेल्यावर विवाहबंधन स्वीकारूं लागली. याच संभ्रमांत पडलेल्या मंडळींना उद्देशून राजारामशास्त्री भागवतांनीं ' घोडेब्रह्मचारी ' व ' घोडेब्रह्मचारिण्या ' हे शब्द वापरले. तारुण्याची निष्कारण हानि व नंतर ध्येयाचीहि हानि शास्त्रीबोवांना मोठी राष्ट्रीय आपत्ति वाटली. आजन्म कुंवार राहाणाऱ्या मुक्ताबाईला त्यांनीं संतांच्या गुरुस्थानीं मानलें. ज्या पंडिता रमाबाईंना टिळकांनीं 'निंद्य' व आगरकरांनीं ' गरीब अबला ' म्हटलें, त्यांना उद्देशून ' पंडिता रमाबाई भाग्याची म्हणून विधवा झाली ' असे उद्गार शास्त्रीबोवांनीं काढले.

आतां आमच्याकडची कोठल्याहि अवस्थेंतील निष्कलंक कौमार्याची निसर्गसुंदर कल्पना पाहा. महाभारतांतलें कुंतीचेंच उदाहरण घ्या. कर्णाच्या जन्माची कथा कौमार्यभंगाची विदारक कहाणी आहे. साध्याभोळ्या कुंतीला वयांत येण्यापूर्वींच दुर्वासानें देवांदिकांकडून वांछित संतति होण्याचा वर दिला व बालिकासुलभ जिज्ञासेनें त्या वराची प्रचीति तिनें पाहातांच सूर्यानें केवळ शब्दच्छलानें ती 'नको, नको' म्हणत असतां तिचा कन्याभाव दूषित केला. पण ही केवळ फसवणूक असल्यानें कुंतीच्या मनाचें पावित्र्य कायमच राहिलें आणि या पावित्र्याची पुरेपूर जाणीव असलेल्या व्यासांनीं कर्णाच्या जन्मानेंहि तिचें कौमार्य दूषित न होतां भूषित झालें, असेंच दाखविलें आहे. युद्धें वारंवार होत असतां आणि तरुण, तेजस्वी क्षत्रियपुत्र धारातीर्थीं सतत पतन पावत असतां, कौमार्याचें उच्च ध्येय डोळ्यांपुढें ठेवूनहि शूरांच्या मातांचा कोठल्याहि अवस्थेंत गौरव व्यास-वाल्मीकींना करावा लागला. आणि म्हणूनच कन्या-भावाची कल्पना जितकी उच्च, तितकीच विस्तृत पण त्यांना करावी लागली. मत्स्यगंधेची कथा हेंच सुचविते. व्रतस्थ तापसांना आणि भीष्मासारख्या लढवय्यालाहि याच तपोयुक्त कौमार्याच्या कल्पनेनें अमरपद दिलें. पार्वतीचें परमसुंदर कौमार्य याच संयमाच्या प्रेरणेंतून निर्माण झालें. तें संस्कृतांत कालि-दासानें अमर केलें. याच कौमारभावांतून निर्माण झालेल्या विरक्तीनें संतांची तेजस्वी परंपरा भारतांत उत्पन्न केली. आणि रोजच्या व्यवहारांत ही कल्पना कोणीं राबविली बरें ? तर निव्वळ ' काळी—पांढरी '-










ची जोपासना करणाऱ्या निर्बुद्ध आदिवासींनीं, कुणब्यांनीं आणि खेडोखेडींच्या अशिक्षित बायकांनीं. कसें तें पाहा !

व्यवहारांतील हीं जीं उदाहरणें मी देणार आहें, त्यांचा मुख्य आशय असा, कीं निष्कलंक कौमार्य सर्वदा विकासोन्मुख असतें. आपल्यापेक्षां उच्च विभूतींत विलीन होण्याकरितांच हें आत्मसमर्पण होत असतें. वय त्याच्या आड येत नाहीं. तुळशीच्या रोपाचेंच उदाहरण घ्या. तुळस ही कुमारिकेचें प्रतीक आहे. ती साधी आहे. मंजिऱ्या आल्यानें यौवनाच्या जाणिवेमुळें लज्जापरिपूर्ण होऊन ती लालसर, सांवळी झाली आहे. सृष्टीच्या सर्व रंगांत बहारदार अशा हिरव्यागर्द रंगाच्या पानांनीं ती सर्वदा नटलेली असते. दर वर्षीं बाळकृष्णाशीं तिचें लग्न आम्ही कां लावतों ? तुळस खरी निसर्गकुमारी आहे. बाळकृष्णाशीं म्हणजे निसर्गांतल्या बाळरूप, सर्वस्वीं निष्कलंक अशा पुरुषी विभूतीशींच ती तादात्म्य पावते. अगदीं नूतनविवाहित शुद्ध मुलीचा पति केवळ लग्न झाल्यानंतर गुप्त व्हावा, फिरून वर्षांतरानें त्याच स्थितींत दोघांची दृष्टभेट व्हावी, फिरून तो तसाच अदृश्य व्हावा, असें हें सारखें चालू असतें. या रहाटगाडग्यांतील एक मनोहर सत्य असें, कीं तुळस उत्कंठित प्रेमला असून सुद्धां संयमी आहे. आपल्या केवळ मानसिक प्रेमभावांतच रंगलेली आहे. याच कल्पनेंतून वेश्या पिंगला सती झाली, ही कथा निघालेली आहे. सोप्या शब्दांत सांगायचें म्हणजे पिंगलेलाहि तपस्येमुळें फिरून उज्ज्वल कौमार्याचा, वैराग्याचा साक्षात्कार झाला.

वृंदा हें तुळसीचें पुराणिकांनीं कल्पिलेलें मनुष्यरूप. पोटभरू पुराणिकांनीं लग्नाच्या कल्पनेला अवास्तव प्राधान्य देऊन द्वारकेंतल्या कृष्णाशीं तिचें एकदांच लग्न लावून तिला अष्टनायिकांत बसविलें. द्वारकानगरीच्या आसपास वाळवंटी प्रदेशांत, घराघरांच्या आसऱ्यानें, शेताशेतांच्या सभोंवार तुळशीचीं उंच वनें माना डोलवीत उभीं असतात. बाकी फुलझाडें कांठेवाडच्या रेताड मातींत जीव धरीत नाहींत.

आतां खेडोखेडींच्या कुणब्यांची कल्पना पाहा. कोंकणांतल्या रत्नागिरी जिल्ह्यांत ' लिंबाचीं गाणीं ' म्हणतात. कुमारिका वयांत येतेवेळच्या प्रसंगास अनुलक्षून म्हटलेलीं तीं लोकगीतें आहेत. त्यांत लिंबीच्या सुंदर, हिरव्यागार, पूर्ण वाढलेल्या पण लहानखोऱ्या, सुवासिक झाडाची उपमा संगमोत्सुक कुमारिकेला दिली आहे. लवकरच बहरू पहाणाऱ्या, फळांनीं सुशोभित होणाऱ्या झाडाचें वैभव कुमारिकेला कां विलोभनीय वाटणार नाहीं ? बाराचौदा वर्षांच्या कोंवळ्या मुलीला तारुण्याची आणि मातृत्वाची जाणीव देणारा इतका गंभीर व हळुवार इषारा माझ्या पहाण्यांत दुसरा नाहीं. त्यांतलें एकच रूपकात्मक गाणें देतें. तें असें :

आभा गडगडे आभाबरी<br>
झाला पाऊस मीरगाचा<br>
चाले पाऊस रोयणीचा<br>
थेंब पडतो मोतीयाचा<br>
काळ्या काढाव्या तोरणीच्या<br>
कधीं लिंबा तूं रे जाशी ?<br>
कोठें लिंबा तूं रे जाशी ?<br>
लिंब जातो तो मामाच्या मांडीवर,<br>
लिंब जातो तो कुंवाराचा<br>
लिंब जातो तो नदिच्या कांठाला.

या गाण्यांना ' कुणब्यांचे किंवा मगराचे वेद ' म्हणतात. आतां दुसरें याच कुणब्यांचें मुलीच्या लग्नाच्या वेळचें माहेरचें गाणें पाहा :

दारीं होती हिरवी राई<br>
खेळत होती नवरीबाई.<br>
केली सारी वाढविली<br>
जाई सारी फुलविली<br>
कडेखांदीं वागविली.<br>
नवरदेवांनीं चोरुनि नेली.<br>
धांवधांवोनी, तिचे आई,<br>
आतां धांवोनी काय करिसी ?<br>
ज्याची होती त्यानें नेली<br>
तुझी माया व्यरथ गेली.

कुमारिकेची केळीकर्दळीशीं व जाईच्या वेलीशीं तुलना महाराष्ट्रांत सार्वत्रिक आहे. या







गाण्यांतील शब्दांची नाजूक पेरणी पाहा. अशिक्षित मातेच्या मर्मातून निघालेला हा करुण हुंकार कविश्रेष्ठ कालिदासालाहि शाकुंतलांत साधला नाहीं ! या गाण्यांतलें भावबंधन केवळ स्त्रियाच व्यक्त करूं जाणोत !

रुईचें झाड देखील आमच्या गांवढ्या संस्कृती-नें याच कल्पनेला वाहिलें आहे. म्हणूनच शनि-वारच्या अशुभ दिवशींहि जितेंद्रिय मारुतीच्या कंठीं निर्गंध रुईफुलांची माळ दर आठवड्याला जाऊन पडते. तुळशीपेक्षांहि रुईचें हें व्रत अधिक निर्विकार व कौमार्यपूर्ण आहे. मारुतीकडून कोणतीच अपेक्षा ती करीत नाहीं.

व्यवहारांत सुद्धां रुई अत्यंत सहनशील कुमा-रिकेचें प्रतीक मानलें आहे. तिजवराची ती सक्तीची भार्या बनते. विधिपूर्वक पाणिग्रहणानंतर तिजवर पतिराज तिचें पुष्पमंडित शिर लीलेनें उडवितात व लगेच चवथ्या मुलीशीं संसार मांडतात. तरी पण रुईचें व्रत भंगत नाहीं.

छिंदवाड्यांतले भरिया नावांचे आदिवासी सुंदर कुमारिकेला रुईच्या झाडाची उपमा देतात. निळ्यापांढऱ्या पुष्पगुच्छांनीं सर्वदा नटलेला रुईचा देह त्यांना फार मनोहर वाटतो.

मध्य-प्रांतांतले मूळचे ब्राह्मण रहिवासी (कृष्ण-शाखेचे देशस्थ) हे आतां फार मागें पडले आहेत. बोली व आचारविचार सुद्धां त्यांचे बरेचसे वरच्या दर्जाच्या शेतकऱ्यांसारखे आहेत. त्यांच्यामध्यें अशींच गाणीं आहेत असें ऐकतें. त्यांचा कशिदाहि पुरातन आहे. कुमारिकेच्या चोळीवर तुळशीची मंजरी आणि रुईफूल यांखेरीज दुसरा कशिदा ते कधींच काढीत नाहींत.

---

## 'सत्यमेव जयते'ची वेदकालापासूनची परंपरा

सुप्रसिद्ध प्राच्यविद्यापंडित व संशोधक प्रो. ल्यूडर्स हे १९४३ सालीं निधन पावले. ऋग्वेदांतील वरुणसूक्तांसंबंधीं आणि वरुणासंबंधीं त्यांनीं मौलिक संशोधन करून त्यावर आपला एक प्रबंध तयार केला होता. पण तो हस्तलिखित स्वरूपांत असतांनाच दुसऱ्या महायुद्धांतील जर्मनीवरील वैमानिक हल्ल्या-मुळें त्याची वाताहत झाली होती. प्रो. ल्यूडर्स यांचे शिष्य डॉ. आल्सडॉर्फ यांनीं प्रो. ल्यूडर्स यांच्या वाताहत झालेल्या हस्तलिखितांचे तुकडे जुळवून प्रो. ल्यूडर्स यांचें संशोधन प्रसिद्ध करण्याचें योजलें आहे.

डॉ. आल्सडॉर्फ हे हल्लीं भारतांत कांहीं महिन्यांच्या दौऱ्यावर आहेत. त्यांचे पुणें विद्यापीठातर्फे येथील 'भांडारकर प्राच्यविद्यासंशोधनमंदिरां'त (८-३-५१) व्याख्यान झालें. त्या व्याख्या-नांत त्यांनीं प्रो. ल्यूडर्स यांची वरुणविषयक उपपत्ति सांगितली. त्यांच्या म्हणण्याचा आशय असा : "वैदिक संशोधकाचा आतांपर्यंत साधारणः सिद्धान्तरूप समज असा होता कीं, ऋग्वेदांतील देवतांच्या मागें निसर्ग-चमत्कार अनुस्यूत आहेत. ऋग्वेदकालीन समाज हा निसर्गपूजक होता आणि त्या समाजांत सूक्ष्म विचार किंवा तत्त्व यांचा प्रामुख्यानें उदय झालेला दिसत नाहीं. पण निसर्गपूजासिद्धान्तानें ऋग्वेदांतील ज्या कांहीं देवतांचा अर्थ लागत नाहीं, त्यापैकीं वरुण ही प्रमुख देवता आहे. आकाश, चंद्र किंवा जलदेवता असें समजून वरुणाच्या सूक्तांचा नीट अर्थ लागत नाहीं. वरुणाचा 'ऋता'शीं अविभाज्य संबंध आहे. ऋत म्हणजे सत्य, मानवी व्यवहारांतील सचोटी. ऋताचा, सत्याचा पालनकर्ता, मानवाच्या व्यवहारांतील सत्यासत्यतेबद्दल काटेकोरपणें निवाडा देणारा मूर्तिमंत न्यायाधीश, प्रतिज्ञापालनाची देवता—हेंच खरें वरुणाचें स्वरूप आहे. ज्या मित्र देवाशीं ('मित्रावरुणौ') वरुणाची ऋग्वेदांत सांगड घातलेली दिसून येते, तो 'मित्र' (किंवा हिटाइट लोकांचा 'मिथ्र') देखील सूर्य नसून, प्रतिज्ञा, तहनामा (Treaty), शपथ याचा मूर्तिमन्त साक्षी असा देव होता, हें सांपडलेल्या पुराणावशेषांवरून निःसंदिग्धपणें सिद्ध झालें आहे. ऋग्वेदकालीन आर्य लोक, फार काय खुद्द इंडोयुरोपीय लोक यांच्यावर या 'सत्या'च्या, 'ऋता'च्या कल्प-नेचा प्रभाव अत्यंत पडलेला दिसून येतो. प्राचीन सत्यव्रत वरुण, भारतीय संघराज्यानें स्वीकारलेलें 'सत्य-मेव जयते' हें ब्रीदवाक्य, म. गांधी यांचा 'सत्य हाच परमेश्वर' हा विचार व तदनुगामी असा त्यांचा 'सत्याग्रही' आचार, या सर्व गोष्टींवरून भारतीय विचारपरंपरेचे विस्मयकारक सातत्य प्रत्ययास येतें."



अनुक्रमणिका






प्रा. देवदत्त अ. दाभोलकर

# भारतीय अंदाजपत्रकांची पार्श्वभूमि

रिवाजाप्रमाणें ता. २८ फेब्रुवारी १९५१ रोजीं श्री. देशमुख यांनीं आपलें वार्षिक अंदाजपत्रक विधिमंडळाला सादर केलें. कांहीं अनुकूल, कांहींशीं प्रतिकूल टीका झाली. परिस्थितीच्या मर्यादा लक्षांत घेतां, श्री. देशमुख यांनीं आपलें अंदाजपत्रक आंखतांना तज्ज्ञाची कुशलता दाखविली, हें मान्य करणें आवश्यक आहे. अर्थमंत्र्याला बंधनकारक होणाऱ्या मर्यादा या राजकीय व आर्थिक परिस्थितींतून निर्माण होत असतात. या मर्यादांचें निराकरण करणें हें राजकीय पुढाऱ्यांचें कार्य आहे, अर्थमंत्र्याचें नव्हे. परंतु या मर्यादांची स्पष्ट जाणीव देशांतील सर्वसामान्य जनतेलाहि असणें अगत्याचें आहे. कारण त्यामुळेंच आपल्या प्रगतीचा गाडा कोठें व कां अडखळत व अडत आहे, तें कळून येईल.

राष्ट्रीय जमाखर्चाची तोंडमिळवणी करणें हेंच अंदाजपत्रकाचें मुख्य कार्य आहे, असें बरेच दिवस मानण्यांत येई. श्रीमंतांवर कर बसवून त्या पैशाचा विनियोग गरीबांसाठीं करावा, ही कल्पनाहि मान्य होऊन बरेच दिवस झाले. आधुनिक अर्थशास्त्र याहिपुढें गेलें आहे. राष्ट्रीय उत्पन्नापैकीं बऱ्याच मोठ्या भागाचा खर्चवेंच अलीकडे मध्यवर्ती सरकार, प्रांतिक सरकारें व स्थानिक स्वराज्य संस्था यांच्या हातून होत असतो. या भागाचें एकूण राष्ट्रीय उत्पन्नाशीं प्रमाण अमेरिकेंत शेंकडा २५, इंग्लडमध्यें शेंकडा ४० व भारतांत शेंकडा सुमारें १० असें आहे ( १९४९–५० मधील भारतांतील हा खर्च ७१२ कोटी रुपयांचा होता. ) अशा प्रचंड प्रमाणांवरील आयव्ययाचा परिणाम एकूण राष्ट्रीय संपत्तीचें उत्पादन, विभाजन व उपभोग यांवर होणें अपरिहार्य असतें. अंदाजपत्रकांतील आयव्ययी धोरण आंखतांना या परिणामाकडे साक्षेपानें दृष्टि ठेवावी लागते. राष्ट्रांतील एकूण साधनसंपत्तीचा, मनुष्यबळाचा पुरेपूर उपयोग करून घेऊन राष्ट्रीय उत्पन्नाचा उच्चांक गांठणें, हेंहि सरकारांच्या आयव्ययाच्या सुजाण, जागरूक, कार्यक्षम धोरणावर अवलंबून असतें, असेंहि आधुनिक अर्थशास्त्राचें सांगणें आहे. याच दृष्टीनें अर्थमंत्र्याला आपलें अंदाजपत्रक आंखावयाचें असतें.

जनतेला कोणत्याच गोष्टीची स्मृति फार काळ राहत नाहीं, असें म्हणतात. स्वातंत्र्यपूर्व कालांतील अंदाजपत्रकांवरील आपले आक्षेप एकदां आठवून पहाणें या दृष्टीनें सोयीचें होईल. आपले आक्षेप मुख्यत्वेंकरून पुढीलप्रमाणें होते—( १ ) अंदाजपत्रकावर हिंदी जनतेचें नियंत्रण नाहीं. ( २ ) संरक्षणासाठीं होणारा खर्च हा भारताला न पेलणारा आहे. ( ३ ) गरीबांना न पेलणारे असे कर द्यावे लागतात. ( ४ ) सनदी नोकरांचे पगार वाजवीहून फारच अधिक आहेत. डोईजड कर द्यावे लागतात; परंतु त्यापासून पुरेसें फळ मात्र कोणतेंच मिळत नाहीं, हाच वरील सर्व आक्षेपांचा सुटसुटीत निष्कर्ष आहे. आज स्वातंत्र्य मिळून तीन अधिक वर्षें होऊन गेलीं. पहिला आक्षेप अर्थातच आतां राहिला नाहीं. परंतु इतर आक्षेप मात्र अद्यापहि घेण्यास पुष्कळच जागा आहे, ही गोष्ट उघड आहे. संरक्षणावर आजहि मध्यवर्ती सरकारच्या खर्चापैकीं जवळजवळ पन्नास टक्के खर्च करण्यांत येतो. मध्यवर्ती सरकार व प्रांतिक सरकारें यांचा









अनुक्रमणिका

एकूण खर्च एकत्रित केला, तरी संरक्षण व अन्तर्गत सुरक्षा यासाठीं होणाऱ्या खर्चाचें प्रमाण एकूण खर्चाशीं शेंकडा ४३ इतकें पडतें. प्रत्यक्ष समाजोपयोगी गोष्टींसाठीं होणाऱ्या खर्चाचें एकूण खर्चाशीं प्रमाण शेंकडा २० असें पडतें. यावरून याबाबतींत आपण युद्धपूर्वकालीं होतों तेथेंच आहोंत; कदाचित् कांहींशीं आपली परागतिच झाली, असें आढळून येईल. गरीबांवरील करहि तितकेच डोईजड आहेत. स्वतंत्र भारतानें मिठावरील कर काढून टाकला, ही गोष्ट खरी. परंतु तें केवळ एक राजकीय निदर्शन झालें. गरीबांपर्यंत तितक्याच निकडीनें जाऊन पोहोंचणारे इतर अनेक कर आहेतच. हिंदुस्थान हा गरीबांचा देश असल्याकारणानें सरकारला आपल्या पैशाचा कांहीं भाग गरीबांकडून गोळा करणें अपरिहार्य, अशी नवी तात्त्विक बैठकहि यंदापासून श्री. देशमुख यांनीं घालून दिली आहे. श्रीमंतांवर कर बसविण्याची आर्थिक मर्यादा संपली नसली, तरी तसें श्रीमंतांवर दडपण आणण्याची सरकारची राजकीय शक्तिमर्यादा संपली, असा याचा अर्थ आहे. सनदी नोकरांचे पगार पूर्ववत् आहेतच. नवीन मंत्र्यांचें पगारहि त्याच श्रेणींत आहेत. अधिकारावर नसतांना कॉंग्रेसनें आंखलेली वेतन-मर्यादा लोक विसरूनहि गेले; पैशाच्या विलोभनानेंच काम करून घ्यावयाचें झाल्यास पूर्वीची अभिप्रेत वेतनें अगदींच अपुरीं होतीं, असेंच माझें मत आहे. सनदी नोकरांनीं आपल्या वेतनाचा पुरेपूर मोबदला सरकारला दिला, हेंहि मान्य करणें उचित आहे. परंतु त्यागशील क्रांतिकारक नेतृत्वाची अपेक्षा ज्यांच्याकडून ठेवावी, ते कॉंग्रेसचे धुरीणहि पैशाच्या जाळ्यांत अडकले जावे, याचें दुःख वाटतें. एकूण राष्ट्राच्या खर्चांत त्यामुळें फार मोठा फरक पडला असें नव्हे; परंतु ज्या नैतिक वातावरणावर विधायक क्रान्तीचा वेग अवलंबून असतो, तें वातावरण ज्या अनेक कारणांमुळें स्वातंत्र्योत्तर कालांत भारतांत निर्माण होऊं शकलें नाहीं, त्यांत हेंहि एक कारण होतें असें मला वाटतें. असो हा कांहींसा अर्थकरणाच्या क्षेत्राबाहेरील विचार झाला.

अर्थकारणाच्या दृष्टीनें स्वातंत्र्यप्राप्तीनंतर भारत सरकारपुढें तीन प्रमुख प्रश्न होते : (१) सर्व वस्तूंच्या चढत्या किंमतींना आळा घालून शक्य तर त्या किंमती खालीं उतरविणें. (२) एकूण राष्ट्रीय उत्पन्न वाढविणें. (३) राष्ट्रीय उत्पन्नाची अधिक समविभागणी साधणें. या तीनहि प्रश्नांशीं अंदाजपत्रकांची आंखणी निगडित होती. अंदाजपत्रकांतील धोरणाचा या तीनहि गोष्टींवर परिणाम होणें अपरिहार्य होतें. कसें तें आतां पाहूं.

युद्धकालांत भारतांत मोठ्या प्रमाणावर चलन-वाढ झाली व तिचा परिणाम किंमती वर चढण्यांत झाला, ही गोष्ट आतां सर्वविश्रुत आहे. तेव्हां त्या चलनवाढीचें विवेचन करण्याचें कारण नाहीं. युद्धोत्तर कालांत, किंमती खालीं आणावयाच्या असतील, तर अंदाजपत्रकांतील आय हा व्ययापेक्षां नेहमीं अधिक ठेवणें आवश्यक होतें. आय हा व्ययापेक्षां अधिक असणें किंवा आयव्ययाची तोंड-मिळवणी असणें या गोष्टी नेहमींच इष्ट असतात, असें नव्हे. कांहीं प्रसंगीं तुटीचें अंदाजपत्रकहि राष्ट्राच्या हिताचें असतें, असें अर्थशास्त्र शिकवितें. परंतु चलनवाढीनें वर गेलेल्या किंमती खालीं आणावयाच्या असतील, तर मात्र आय अधिक असलेलें, शिलकी अंदाजपत्रकच आंखावें लागतें. तुटीचें अंदाजपत्रक आंखल्यास ती तूट भरून काढण्यासाठीं आणखी चलन निर्माण करावें लागतें व किंमती अधिकच वर जातात. ही गोष्ट स्वतंत्र भारतांतील पूर्वीच्याहि सुविद्य अर्थमंत्र्यांनाहि माहीत होती. परंतु कांहीं अंशीं त्यांनीं या गोष्टीकडे कानाडोळा केला. कांहीं अंशीं एकूण परिस्थितीहि त्यांच्या आवांक्याबाहेरील होती.

कानाडोळा केला असें मी म्हणतों त्याचें कारण असें : शिलकी अंदाजपत्रक आंखतांना केवळ चालू अंदाजपत्रका-(Revenue Budget)कडेच लक्ष ठेवून चालत नाहीं. तर भांडवली अंदाजपत्रका-(Capital Budget)चाहि विचार करावा लागतो. चालू अंदाजपत्रकामध्यें सरकारच्या वार्षिक चालू खर्चाचा विचार असतो. भांडवली अंदाजपत्रकांत अधिक स्थिर स्वरूपाच्या योजनांविषयींची तरतूद असते. अंदाजपत्रकाची अशी विभागणी करण्याची







पद्धत अलीकडील काळांतच स्वीकाण्यांत आली. आपले पूर्वीचे अर्थमंत्री केवळ चालू अंदाजपत्रकाची तोंडमिळवणी करण्याचा प्रयत्न करून समाधान मानून घेत असत. परंतु भांडवली अंदाजपत्रक तुटीचें राही व त्यामुळें एकूण अंदाजपत्रक तुटीचें होऊन चलनवाढीच्या दृष्टीनें व्हावयाचे ते परिणाम होतच असत. ही जनतेची दिशाभूल करणारी हातचलाखी करण्यांत यावी व ती बहुतांशीं खपून जावी, हें खरोखरच आपलें दुर्दैव होय. कोणतेंहि अंदाजपत्रक तुटीचें झालें, फार काय पूर्वीच्या गंगाजळीचा उपयोग तूट भरून काढण्यासाठीं केला, तरी चलनवाढीचे दुष्परिणाम सोसावे लागतात, असा स्पष्ट इशारा व कबुलीहि यंदाच्याच अर्थमंत्र्यांच्या भाषणांत प्रथम दिसून येतात.

कांहीं अंशीं परिस्थितीहि अर्थमंत्र्याच्या आटोक्याबाहेरील होती, हेंहि खरें. कर वाढवून उत्पन्न वाढविण्याची मर्यादा संपत आली होती. श्रीमंत वर्ग पूर्वीचे कर यशस्वीपणें चुकवीत होता व आपल्यावर बसणाऱ्या नवीन करांना विरोध करीत होता. सरकारी कर्जे विकत घेऊन सरकारला कर्जरूपानें पैसा द्यावयासहि या वर्गानें नाखुषीच दाखविली. कर नाहींत, कर्जे नाहींत व ही परिस्थिति बदलण्याची राजकीय शक्ति नाहीं, अशी सरकारची गत झाली. उलट, खर्चांत कपात करण्याचीहि विशेष अशी शक्यता सरकारला दिसेना. पाकिस्तानशीं विरोध, काश्मीरचें युद्ध यांमुळें संरक्षणखर्च अपरिहार्य होऊन बसला. देशाच्या विभागणीनंतर उत्पन्न झालेले अनेक प्रश्न, निर्वासितांचा प्रश्न, अन्नधान्यविषयक प्रश्न, दुष्काळ, महापूर, भूकंप अशा आकस्मिक नैसर्गिक आपत्ती, यांमुळेंहि अनेक नवीन मोठे खर्च निर्माण झाले. याशिवाय देशाच्या औद्योगिक अभ्युदयासाठीं हातीं घेतलेल्या अनेक योजनांवरील खर्च हेहि आहेतच.

यांपैकीं कांहीं खर्च खरोखरच आवश्यक व अपरिहार्य होते. इतर कांहीं खर्च आवश्यक होते, परंतु त्यांच्या बाबतींत योग्य नियोजनाभावीं उधळपट्टीच अधिक झाली. 'अधिक धान्य पिकवा' मोहीम, सिंदरी फॅक्टरी, तयार घरांची योजना—या व अशा इतर कांहीं योजनांतून निरर्थक, निष्फळ खर्च करण्यांत आला. या अनुभवावरून आपल्या बौद्धिक व नैतिक पातळीविषयीं कोणी अनुदार उद्‌गार काढल्यास आपल्याला त्याचा राग तरी कां यावा ? संरक्षणखर्चाविषयीं बोलणें म्हणजे याहूनहि अधिक नाजूक विषयाला हात घालण्यासारखें आहे. मध्यवर्ती सरकारच्या एकूण ३७५ कोटींच्या खर्चापैकीं १८० कोटी संरक्षणावर खर्च करणारा भारत व ७५ कोटींच्या खर्चापैकीं ५० कोटी संरक्षणावर खर्च करणारें पाकिस्तान या दोहोंपैकीं कोणाची स्तुति अधिक करावी, हें ठरविणें खरोखरच कठिण आहे ! या दोनहि राष्ट्रांचा संरक्षणखर्च आज परस्परविषयक अविश्वासानें, विद्वेषानेंच केवळ होत आहे. या दोनहि राष्ट्रांची प्रगति या खर्चामुळें अडून राहिलेली आहे. या दोन राष्ट्रांत परस्परविश्वास निर्माण करतां आला ( तें राजकीय पुढाऱ्यांचें काम आहे; अर्थशास्त्रज्ञाचें नव्हे ), तर हा खर्च कितीतरी कमी करतां येईल. कारण कोणत्याहि बड्या राष्ट्राच्या आक्रमणाच्या दृष्टीनें पाहिलें, तर आपण लष्करी तयारीवर कितीहि खर्च केला, तरी तो अगदींच अपुरा पडणार, हें उघड आहे. अमेरिका वा रशिया यांचें लष्करी आक्रमण लष्करी सामर्थ्यानें थोपविण्याचा आपण कितीहि प्रयत्न केला, तरी आणखी कित्येक दशकें तें आपल्याला शक्य होणार नाहीं, एवढी खूणगांठ आपण बांधावयास हरकत नाहीं. भारत-पाकिस्तानमधील चाळीस कोटी जागृत जनतेचा विरोध आपल्याला होईल व प्रतिपक्षाचें शस्त्रसाहाय्य या जनतेला मिळेल, ह्या भीतीनेंच केवळ हे विरोधी राष्ट्रगट आक्रमणापासून दूर राहणें अधिक शक्य आहे. आन्तरराष्ट्रीय राजकारणांत आज लष्करी सामर्थ्य कोणत्या मर्यादेला जाऊन पोहोचलें आहे, याची कल्पना आली तरच कदाचित् हें विवेचन हास्यास्पद वाटणार नाहीं. अमेरिकेचें उदाहरण पुरेसें आहे. २७ जानेवारी रोजीं ट्रूमन यांनीं मांडलेल्या योजनेप्रमाणें अमेरिकेचा लष्करी व इतर युद्धविषयक गोष्टींसाठीं व्हावयाचा वार्षिक खर्च पंचवीस हजार कोटी रुपयांचा व्हावयाचा आहे. हार्वर्ड येथील अर्थशास्त्रज्ञांच्या मतें १९५३ पासून लष्करी तयारीसाठीं प्रतिवर्षी ४५००० कोटी रुपये खर्च करण्याची शक्ति अमेरिकेंत येईल ! कोठें हें ४५००० कोटी आणि








कोठें आमचें १८० कोटी व पाकिस्तानचे ५० कोटी !!

वरील विवेचन आयव्ययाच्या तोंडमिळवणीचें व चलनवाढविषयक झालें. औद्योगिक उत्कर्षाच्या योजनांवरील खर्चहि तुटीच्या अंदाजपत्रकाला व चलनवाढीला कारणीभूत होऊं शकेल. चुकीच्या पद्धतीनेंच अनाठायीं खर्च झाला, तर उत्कर्ष तर नाहींच, परंतु केवळ चलनवाढ मात्र पदरांत पडेल. परंतु योजना आपण कार्यक्षमतेनें आंखूं शकतों व पार पाडूं शकतों असेंहि गृहीत धरलें, तरी अशा योजना हातीं घ्याव्यात कीं नाहींत ? त्यासाठींच चलनवाढ होऊं द्यावी काय ? योजना हातीं न घेतां औद्योगिक उत्कर्ष अडवून ठेवण्याची कल्पना मनाला प्रथमदर्शनीं कशीशीच वाटते. म्हणून या प्रश्नांचा कांहींसा अधिक सूक्ष्म विचार केला पाहिजे.

भांडवलशाही अर्थव्यवस्थेंत औद्योगिक उत्कर्षाचे मार्ग दोन असतात—(१) सरकारनें आंखलेल्या व पार पाडावयाच्या आर्थिक अभ्युदयाच्या योजना व (२) भांडवलदारांनीं करावयाचें उत्पादन. हा दुसरा मार्गच अर्थात् भांडवलशाही अर्थव्यवस्थेंत अधिक महत्त्वाचा असतो. या दोनहि मार्गांशीं अंदाजपत्रकाचा संबंध असतो. पहिल्या मार्गांत वर उल्लेखिलेला चलनवाढीचा प्रश्न येतो. ही चलनवाढ तितकीशी जाणवणार नाहीं, असेंहि कांहीं वेळां सांगण्यांत येतें. कारण चलनवाढीमुळें जशी लोकांची क्रयशक्ति वाढत, त्याचप्रमाणें उत्पादनवाढ होऊन विक्रीच्या वस्तु वाढल्यामुळें किंमती फार वर चढणार नाहींत, अशी अपेक्षा असते. येथें अपेक्षाभंगच पदरांत पडतो. कारण चलनवाढ ही तत्काळ होत असते. उत्पादनवाढीला कांहीं काळाचा, बहुधा कांहीं वर्षांचाहि विलंब लागतो. चलनवाढ करून उत्पादन वाढवावें, परंतु चलनवाढीमुळें लोकांच्या जीवनमानावर होणारे दुष्परिणाम मात्र शक्य तों टाळावेत, अशीहि कल्पना सुचण्यासारखी आहे. ही कल्पना अधिक आकर्षक वाटते. कारण औद्योगिक उत्कर्ष या कल्पनेप्रमाणें स्थगित करावा लागत नाहीं. आवश्यक वस्तूंचें भावनियंत्रण, वांटपपद्धति, करवाढ या मार्गांनीं चलनवाढीचे दुष्परिणाम कमी करतां येतात. परंतु ते मार्ग अनुसरण्यासाठीं लागणारें सामर्थ्य भारतसरकारकडे नाहीं, हें आपण प्रत्यहीं पाहतोंच. तेव्हां तुटीच्या भांडवली अंदाजपत्रकाच्या मार्गानें आपल्या औद्योगिक उत्कर्षाच्या योजना पार पाडणें म्हणजे चलनवाढीच्या सर्व दुष्परिणामांना आवाहन करणेंच होय.

उत्पादनवाढीसाठीं खाजगी भांडवलदारांची मनधरणी हा दुसरा मार्ग झाला. लियाकतअल्लींचें १९४७ चें अंदाजपत्रक भांडवलदारांना अगदींच मानवलें नाहीं. त्या वेळेपासून दरवर्षी अधिकाधिक सवलती देऊन सरकार भांडवलदारांचा अनुनय करण्याचा प्रयत्न करीत आहे. यंदाच्या अंदाजपत्रकांतहि भांडवलदारांवरील बोजा न वाढावा, यासाठीं कटाक्षानें प्रयत्न करण्यांत आलेला आहे. भांडवलशाही चौकटींत पुन्या व्हावयाच्या कोलंबो—योजनेनें, भांडवलदारांवरील कर वाढवूं नयेत, असा स्पष्ट इशारेवजा आदेशच भारतसरकारला दिलेला आहे. भारतसरकारनेंहि तो मानलेला दिसतो. संपूर्ण अंदाजपत्रक बाहेर येतांच शेअरबाजारांत आलेली तेजी भांडवलदारांच्या उत्साहाची निदर्शक आहे. एकूण उत्पादनवाढीच्या दृष्टीनें या उत्तेजनाचा किती उपयोग होतो, हें पुढें कळून येईल.

राष्ट्रीय उत्पादनाची अधिक समविभागणी साधणें हें अंदाजपत्रकांचें तिसरें ध्येय कितपत साध्य झालें, याचें विशेष विवेचन करण्याचें कारण नाहीं. भांडवलदारांवर अधिक कर लादणें ज्या सरकारला अशक्य झालें, त्याला अर्थातच तिसरें ध्येय कदाचित् तत्त्वतः नसलें, तरी व्यवहारतः सोडणें अपरिहार्यच आहे. परंतु यासंबंधीं अखेरचें मत देतांना प्रान्तिक सरकारांच्या अन्दाजपत्रकांचाहि आपल्याला विचार करावा लागेल. या लेखाच्या मर्यादेंत त्यांचा अन्तर्भाव करतां येत नाहीं.

श्री. देशमुख यांच्या पुढें परिस्थितीनें टाकलेला पेंच या अशा स्वरूपाचा होता. या परिस्थितीच्या मर्यादेंत जें उत्तर अर्थशास्त्रज्ञाला देतां येण्यासारखें होतें, तेंच श्री. देशमुख यांनीं दिलें. गरीबांच्या वर कर वाढविण्यास तात्त्विक मान्यता दिली, कांहीं कर वाढविले, भांडवलदारावर विशेष अशी करवाढ बसविली नाहीं, संरक्षणखर्च वाढवला, भांडवली

[ पुढील मजकूर पान ४७ वर पहा ]










बंगाली लघुकथा : अनुवादक : श्री. जगन्नाथ टंकसाली

# प्रेम आणि मरण !

फत्तेबाद[१] शहरांतील दिलतोडबाग अन् तिसरा प्रहर; शहाजादी जबरउन्नीसा आराम करीत आहे. बागेंतील झाडांच्या शेंड्यांवर संध्यारागाच्या लहरी तरळत आहेत. झाडांझाडांवर बुलबुल पक्ष्यांचे चित्रविचित्र आलाप गुंजत आहेत. गुलाबजलाच्या कारंज्यांतून इंद्रधनुष्याची अवर्णनीय शोभा उसळत आहे. चोहोंकडे तऱ्हतऱ्हेचीं फुलें फुललीं आहेत.

शहाजादीच्या हातांत तंतुवाद्य आहे; त्यावर तीन झंकार चढवून जबरउन्नीसा मृदु स्वरांत गात आहे—

" मम निर्दय प्राणसखा, बाई "

तिचा आवडता सोनेरी रंगाचा पाळीव चित्ता ' फर्रुखसियर ' तिच्या पायाजवळ बसला आहे, अन् आपला पंजा हलवून तिच्या गाण्याला ताल देत आहे; अन् मधून मधून मालकिणीच्या पायांतील मखमली विजापुरी चढाव चाटत आहे.

अशा या सुंदर दृश्य काव्यांत अकस्मात् एका पुरुषाकृतीनें तिथें प्रवेश केला. कोण हे? धष्टपुष्ट शरीर आहे, खूप गौर वर्ण आहे, हनुवटीवर छोटीशी व्यवस्थित दाढी आहे, अंगावर मूल्यवान् पोषाक आहे, कमरेला तलवार लटकत आहे. हेच ते सेनापति, बादशहाचा " उजवा हात " या नांवानें ओळखिले जाणारे सिपहसालार कोफ्ताखां !

जबरउन्निसा चमकली. " आँ! कोफ्ताखाँ ? तुम्ही कसें इथें ? " तिनें विचारलें. " हां प्यारी ! " सेनापतीनें उत्तर दिलें, " आज तुझ्या तोंडून शेवटचा निर्णय ऐकण्यासाठीं मी इथं आलों आहे; पुष्कळ दिवस झाले मीं तुझ्या मायाजालांत सांपडून, आज तूं माझ्याशीं शादी करणार कीं नाहीं, स्पष्टपणें ऐकव ! "

भ्रूकुटी वक्र करून शाहजादी म्हणाली : " बे-वकूफ ! शुद्धीवर आहेस ना ? कोणाशीं बोलत आहेस हें लक्षांत आहे ना ? भरबाजारांतून विकत आणलेला गुलाम तूं ! बादशहाच्या मेहरबानीनें सिपहसालार झालास, बस्स ! आपली पायरी सांभाळून रहा; उगाच मोठ्या घासाच्या आशेनं आपलं लहान तोंड उघडूं नकोस ! "

कोफ्ताखाँ या प्रसंगाला योग्य अशा भीषणतेनें विकट हास्य करून म्हणाला : " शहाजादी, तुझ्या बापाला सिंहासनाधिष्ठित कोणीं केलं ? मराठ्यांचा हल्ला वारंवार कोणीं परतविला ? कोणाच्या मेहरबानीनें तुम्ही ही चैन चालली आहे ? तुझ्या अंगावरील हे हिरे, ही निशात बाग, हा बुलबुलाच्या संगीतानें गुंजित झालेला स्वर्ग, हें सर्व कोणाच्या कृपेनें ? इन्शाल्ला ! ठाऊक आहे का तुला, फक्त माझ्या बोटाच्या इषाऱ्यानें हें सारं कांहीं मी जमीनदोस्त करूं शकतों ? राज्याचा खरा मालिक कोण, तुझा दुबळा बाप कीं, हा रुस्तमे-हिंद कोफ्ताखाँ फतहजंग ! "

शहाजादी सहजतेनें म्हणाली : " कुत्र्याच्या मानेवर आयाळ जडवली म्हणजे तो कांहीं सिंह बनत नाहीं—! "

---

१ श्री. परशुराम यांच्या मूळ बंगाली गल्पिकेचा ( बंगाली लघुकथेचा ) हा हिंदीवरून अनुवाद आहे. ——अनुवादक







सेनापति गरम होऊन कडाडले : " बिस्मिल्ला ! हे शब्द आणखी कोणाच्या तोंडून बाहेर पडते, तर ताबडतोब त्याची कत्तल केली असती; पण तूं माझी हृदयेश्वरी आहेस; तुझ्या मोहब्बतीनें माझे हात बांधले आहेत. ह्या एक वेळीं मी तुला माफ करीत आहे. खैर, अजूनहि कांहीं फारसं बिघडलेलं नाहीं. अजून तरी बोल, माझी ' दिलरुबा ' होशील ना ?–सांग, सांग...! "

जब्बरउन्निसा मजेत हसून म्हणाली : –" कोफ्ताखाँ; हाफिज शिराजीची ती कवितेची ओळ तूं ऐकली आहेस ना; – ' कुत्रे भुंकतात वारंवार, सिंह गर्जतो एकच वार ' ! "

इतकें झाल्यावर कोणताहि पुरुषशिरोमणि स्वस्थ राहिला नसता. विशेषतः त्या मोगल जमान्यांत तर शक्यच नव्हतें ! सिपहसालार गर्जना करून म्हणाला : " अल्–हमदुलिल्लाह ! शहाजादी, घे खुदाचं नांव न् हो मरायला तयार ! " आणि ताडकन् त्यानें म्यानांतून तरवार उपसली. शहाजादी म्हणाली : " आज तूं तर मला खूपच हंसविलंस ! "

—अपमान, भयंकर अपमान ! कोफ्ताखाँच्या निष्ठुर हातांत तरवार चमकली. आकाशांत वीज चमकावी त्याचप्रमाणें–अंतराळांत एक सुवर्णदेह चमकून खालीं पडला ! थोडा अस्फुट, गुदमरलेला आर्तनाद,...मग कांहीं वेळ तडफड...मग सगळं कांहीं खलास...... !

संध्याकाळचा अंधार अधिकाधिक गहिरा होऊं लागला. जब्बरउन्नीसा अजूनहि तीन झंकार चढवून तंतुवाद्यावर मृदु आवाजांत गात होती :

" किति निर्दय प्राणसखा माझा ! "

तिचा आवडता पाळीव चित्ता आपलें भोजन संपवून मोठ्या समाधानानें स्वामिनीच्या पायांतील मखमली चढाव चाटत आहे ! त्याच्या डाव्या बाजूला कोफ्ताखाँची पगडी पडली आहे अन् उजव्या बाजुला त्याची विजार नि चोगा आहे. समोर एक छोटासा ढीग आहे हाडकांचा– !

---

## भारतीय अंदाजपत्रकांची पार्श्वभूमि [ पान ४५ वरून पुढें चालू. ]

खर्चांत कपात केली. परंतु त्यांनाहि अखेर भांडवली अंदाजपत्रक तुटीचेंच सादर करावें लागलें. पुढील वर्षीं सरकार १४० कोटी रुपयांचीं नवीं कर्जें उभारूं शकेल, या विश्वासावर त्यांनीं एकूण अंदाजपत्रक आंखलें आहे. सरकारी कर्जउभारणीचा गेल्या कांहीं वर्षांतील अनुभव कांहीं विशेष उत्साहप्रद नाहीं. श्री. देशमुख इतक्या आत्मविश्वासानें इतकी मोठी अपेक्षा बाळगतात, त्या अर्थीं नवीन कर्जांवरील व्याजाचा दर वाढविण्याचा सरकारचा विचार असला पाहिजे, अशी सर्वसाधारण अपेक्षा आहे. अंदाजपत्रक श्री. देशमुख यांना भूषणावह आहे. परंतु आमच्या राजकीय नेत्यांची अगतिक असहायता मात्र त्यांत पुरेपूर दिसून येते.

---



अनुक्रमणिका





पुस्तकपरीक्षण : श्री. ग. ह. खरे

# श्रीतुकोबारायांच्या अभंगांचा मूळ पाठ ?

गेल्या आषाढी एकादशीच्या सुमारास श्री. बा. ग. ऊर्फ बाबूराव परांजपे यांनीं 'श्रीतुकोबारायांचे अभंग'[१] या नांवाचें एक सुमारें ४७५पानांचें पुस्तक लिहून प्रसिद्ध केलें आहे. यांत त्यांनीं तुकारामाच्या ७५३ अभंगांचें सार्थ व मोठ्या प्रस्तावनेसह संपादन केलें आहे. त्यांस देहूकर घराण्यांतील तुकारामाच्या अभंगांची एक फार महत्त्वाची वही अठरा वर्षांपूर्वीं मिळाली होती व तिचें संपादन आज कित्येक वर्षे ते करीत आहेत, हें मला व इतरांना माहीत असल्यानें त्यांचें हें पुस्तक मी मोठ्या उत्सुकतेनें अवलोकिलें. तेव्हां माझ्या मनांत प्रश्न आले ते असे :

या पुस्तकांत श्री. परांजपे यांनीं तुकारामाच्या अभंगांचा कोणता पाठ स्वीकारला ? देहूकरवही तुकारामाच्या हातची आहे का ? तीमधील पाठ दिला आहे कां ? सख्याहरीच्या वहीचें स्वरूप काय ? श्री. परांजपे यांनीं तिला किती महत्त्व दिलें आहे ? तितकें महत्त्व देणें योग्य आहे का ? तिचा पाठ दिला आहे काय ? दोन्ही वह्यांची आवश्यक व स्पष्ट माहिती दिली आहे का ? माहिती देण्यांत गोंधळ झाला आहे का ? त्यांनीं दिलेल्या तक्त्याचें मूल्य किती ? त्यावरून देहूकर वहीचा पाठ बनवितां येईल का ? ओळ म्हणजे काय ? तिचें महत्त्व काय ? ती श्री. परांजपे यांस या दोन वह्यांत कितपत मिळाली ? आजवरच्या प्रकाशित गाथ्यांत ती कोठें आहे का ? श्री. परांजपे यांनीं अभंगांचा शब्दशः अर्थ दिला आहे का ? य पुस्तकाचा तुकारामाची भाषा किंवा त्याचें तत्त्वज्ञान यांच्या अभ्यासांत प्रगति करण्याच्या दृष्टीनें उपयोग कितपत होईल ? अर्थात् या पुस्तकास महत्त्व किती द्यावें ? इत्यादि. —या सर्व प्रश्नांचीं सविस्तर उत्तरें द्यावयाचीं म्हणजे पांचपन्नास पानें तरी सहज लिहावीं लागतील व दोनतीन महिने तुकारामाच्या अभंगांचें स्वतंत्र तऱ्हेनें परिशीलन केलें पाहिजे. इतकें कोणीं करील तेव्हां करो ! माझ्या जुन्या अभ्यासांत व नव्या अवलोकनांत वरील प्रश्नांचीं उत्तरें मिळालीं, तीं येथें थोडक्यांत नमूद करतों.

प्रथम देहूकर-वही व तुकारामाचें हस्ताक्षर यांविषयीं लिहितों. श्री. परांजपे यांनीं आपल्या पुस्तकांत आरंभींच देहूकरांकडील वहीच्या एका पानाची प्रतिमा दिली असून तिच्या खालीं तिची श्री. तुकोबारायांचें हस्ताक्षर अशी ओळख दिली आहे. तेव्हां श्री. परांजपे यांची त्या वहींतील अक्षर तुकारामाचें असल्याबद्दल खात्री आहे, हें स्पष्ट होतें. मला अगदीं उलट वाटतें. तें हस्ताक्षर तुकारामाचें नसावें अशी माझी समजूत कां तें येथें थोडक्यांत सांगतों. या वहींतील प्रत्येक पानाच्या कडेला तांबडी दुरेघ आहे, असें श्री. परांजपे सांगतात. या वहीचा फोटो दिलेल्या पानांत, दोन अपवाद सोडल्यास एकआड एक अशा २१ तांबड्या काळ्या ओळी आहेत. प्रत्येक अभंगाचा शेवट (हा कधीं तीन अक्षरांचाहि आहे)

---

१ "श्रीतुकोबारायांचे अभंग"—श्री. बा. ग. परांजपे, किं. १० रु. [ १९५० ], आर्यभूषण मुद्रणालय, पुणें.










अनुक्रमणिका

## श्रीतुकोबारायांच्या अभंगांचा मूळ पाठ ?

अट्टाहासानें तांबड्या ओळींत आणण्याचा प्रयत्न केला आहे. इतकें करूनहि जेथें तो तांबड्या ओळींत आणतां येईना, तेथें मागें पुढें दोन उभे दंड असलेलें 'छ' हें अक्षर दंडांसह तांबड्या शाईनें काढून अभंगांची अखेर तांबड्या शाईनें केल्याची समजूत करून घेतली आहे. त्यांतही जेथले दंड काळे काढावयाचे असा संकेत, तेथले ते काळ्या शाईनें काढण्याकरितां दंडांचें दुबार लेखन केलें आहे. शिवाय अभंग प्रत्येक पानावर अशा काळजीनें लिहिले आहेत कीं, कोणताही अभंग एका पानावर अपुरा राहिल्यानें दुसऱ्या पानावर पुरा करण्याचा प्रसंग आलेला नाहीं. आतां हें सर्व तुकारामानें केलें असें समजलें, तर तुकारामानें तांबड्या व काळ्या शाईची प्रत्येकीं एकेक स्वतंत्र दौत व लेखणी जवळ ठेविली होती, दोन्ही शायांची चुकूनहि लेखनांत मिसळ होणार नाहीं अशी खबरदारी तो घेत होता आणि लेखनांतील औपचारिकतेसाठीं डोळ्यांत तेल घालून जपत होता, तसेंच कोणत्या पानावर किती व कोणते अभंग कशा पद्धतीनें लिहावयाचे, याचाहि त्यानें पूर्वविचार केला होता, म्हणजेच अभंगलेखनांत विशिष्ट क्रम किंवा ओळ साधण्यापेक्षां शोभा किंवा प्रदर्शन यांकडे तो अधिक लक्ष देत होता, ( कारण, ओळ किंवा विषयानुक्रम व त्यांतील आनुपूर्वी साधावयाची, तर लहान मोठे अभंग सरमिसळ येऊन संकेत पाळता आला नसता ! ), जणूं कांहीं तुकाराम धंदेवाईक लेखक होता, एवढेंच नव्हे तर स्वतःच्या अभंगांविषयीं तुकारामाची भलतीच आब्यतेची कल्पना होती, फार काय, तुकारामांत कृत्रिमता होती, सहजता नव्हती—इतकें सर्व मुकाट्यानें कबूल करावें लागेल ! पण मला स्वतःस व इतर कोणासहि हें पटणें शक्य नसल्यामुळें श्री. परांजपे यांनीं तुकारामाचें म्हणून दिलेलें हस्ताक्षर तुकारामाचें नव्हे, हीच बालंबाल खात्री होते.

पंडिती गाथेच्या प्रस्तावाच्या शेवटीं ( पृ. ७५ ), ही देहूकर-वही त्यांस पाहावयास मिळाली होती व या देहूकरांच्या वहींत ' सकें १५७१ विरोधीनां संवछेरः सीमगा वद्य द्वितीयाः वार सोमवारः ते दीवसींः प्राःथकाळींः तुकोबानीः तीर्थास प्रयाणं केलें शुभ भवतुः मंगळं ' असा शेरा असल्याचें नमूद केलें आहे. हा शेरा वहींत कोणत्या ठिकाणीं आहे, अभंगांचें व या शेऱ्याचें हस्ताक्षर भिन्न आहे कीं एकरूप आहे इत्यादि माहिती पंडिती व परांजपे प्रतींत नसल्यानें अडचण झाली आहे. हा शेरा तुकारामाच्या हातचा असणें शक्यच नाहीं. हा शेरा श्री. परांजपे यांनीं पाहिला होता कीं नाहीं ? नसल्यास शेऱ्याचें पान कोठें, कसें व कां गेलें यांचा त्यांनीं शोध घेतला होता का ? आणि पाहिला असल्यास त्याविषयीं श्री. परांजपे यांनीं एक चकार शब्दही कां लिहिला नाहीं ? हा शेरा व वही यांचें हस्ताक्षर एकच असल्यास वही तुकारामाच्या हातची नव्हे, हें सिद्ध होत नाहीं काय ? आणि वहीचें अक्षर शेऱ्याच्या अक्षराहून भिन्न असलें, तरी तें तुकारामाचें आहे अशी खात्री होण्यास अधिक पुरावा नको काय ?

देहूकरांची वही तुकारामाच्या हातची आहे, हें मला व इतर पुष्कळ चिकित्सकांना पटत नसलें, तरी तुकारामाच्या अभंगांचा अतिशय काळजीपूर्वक लिहिलेला पाठ आपणांस त्या वहींत पाहावयास मिळतो. याविषयीं शंकाच नाहीं. शिवाय श्री. परांजपे यांची, ती वही तुकारामाच्या हातची आहे अशी खात्री होती. मग त्यांचें कर्तव्य हें होतें कीं, त्या वहींतील अभंग जसेच्या तसे काना, मात्रा, अनुस्वार, ऱ्हस्व, दीर्घ यांमध्यें काडीचाही फरक न करतां छापून लोकांपुढें ठेवावयाचे. पण तसें त्यांनीं केलें नाहीं, ही मोठी दुःखाची गोष्ट आहे. त्यांनीं महत्त्व सांगितलें वहीचें पण पाठ दिला सामान्यतः सख्या-हरीच्या वहीचा आणि त्यांतहि सुधारणा करून !

सख्या-हरीची वही कोणी, केव्हां, कशी लिहिली याविषयीं श्री. परांजपे यांनीं फारसें कांहीं सांगितलेलें नाहीं. एवढेंच नव्हे, तर त्यांनीं सामान्यतः या वहीचा पाठ छापल्यामुळें तिच्या एखाद्या पानाचें तरी छायाचित्र देणें अवश्य असतां तेंहि दिलेलें नाहीं. पण ही वही उपर्युक्त देहूकर वहीची नकल असून, हिच्या लेखकाकडून नकल करतांना, अभंग गळणें, वाचनाची चूक होणें, शब्दांचें आधुनिकीकरण होणें, ' पतिव्रते आनंद मनीं ' हा देहूकर वहींत खात्रीनें नसलेला अभंग नव्यानें आपल्या वहींत, पण देहूकर वहीची ओळ चालू असतां मध्येंच








सामील करणें,—हे दोष घडल्याचें श्री. परांजपे यांनीं नमूद केलें आहे. उपर्युक्त दोष सख्या हरी वहींत आहेत; तर ही वही देहूकर वहीची नक्कल आहे कीं नाहीं, हाच प्रश्न पडतो. त्याचें निश्चयानें अस्तिपक्षी उत्तर देणें कठीण आहे. शिवाय देहूकर वहीच्या पानाचा फोटो दिल्यामुळें ती वही श्री. परांजपे यांनीं यथास्थित छापली नाहीं, हें स्पष्ट होतें तद्वत् या सख्या-हरी वहीच्या पानाचा फोटो न दिल्यानें व तिच्या पाठांत आपण सुधारणा केली आहे असें श्री. परांजपे सांगत असल्यानें, सख्या-हरीचा पाठ तरी कितपत यथास्थित मिळाला, हें समजण्यास आज कोणतेंहि साधन नाहीं.

सख्याहरी वहीची प्रत करणारानें शब्द बदलले नाहींत, असा श्री. परांजपे यांचा दावा आहे. पण त्यांनीं दिलेल्या छायाचित्रांतील पांच अभंगांपैकीं १ व ३ (३६०, ३६२) यांत अनुक्रमें पहिल्या, तिसऱ्या ओळींतील 'जीव' व 'जीवा' या दोन शब्दांऐवजीं 'भाव' व 'देवा' असे दोन शब्द बदलून घातले आहेत. तेव्हां सर्व अभंग देहूकर वहीशीं रुजू घातल्यास त्यांचा वरील दावा टिकणार नाहीं असें वाटतें. खेरीज त्या प्रतकारानें श्री. परांजपे यांनीं नमूद केलेले व मी आतांच दाखविलेला असे दोष केले आहेत आणि श्री. परांजपे यांनीं सख्याहरीच्या पाठांत सुधारणा केली असल्यानें सख्याहरीचा दोषपूर्ण पाठहि मिळाला नाहीं व मिळता तरी त्यानें काय साधलें असतें, हा चिंतनीय प्रश्न आहे.

श्री. परांजपे यांनीं आपल्या पुस्तकांत एकंदर ७५१ + २३३ अ + ४५२ अ मिळून ७५३ अभंग छापले आहेत. पण ही संख्या त्यांनीं कशी तयार केली, हें माझ्या ध्यानांत येत नाहीं. याबाबत त्यांनीं अधिक स्पष्ट खुलासा करावयास पाहिजे होता. त्यांनीं वास्तविक देहूकर-वही, दोन सुटीं पानें, सख्याहरी वही यांत प्रत्येकीं किती अभंग आहेत, सख्याहरी वहींत किती गळले, नवी भर किती पडली—इत्यादि गोष्टी स्पष्ट करावयास पाहिजे होत्या. तसें न केल्यानें घोटाळा झाला आहे. कसा तो पाहा : ७५३ अभंगांपैकीं सख्याहरी वहींतील (६७३+ २३३ अ + ४५२ अ) ६७५ अभंग बाजूस काढले म्हणजे खालीं अभंग ७८ राहतात. श्री. परांजपे यांनीं ७१ अभंग बाहेरून घेतल्याचें सांगि-तलें आहे. हे ७८ मधून उणे केले म्हणजे खालीं ७ अभंग उरतात. हे अभंग वहीचीं दोन सुटीं पानें मिळालीं त्यांतील म्हणावे तर त्यांत एकंदर १०८–११८ व ३५४–३५७ असे १५ अभंग असल्याचें श्री. परांजपे यांनीं सांगितलें आहे. तेव्हां हा हिशेब कसा जुळवावयाचा ? दोन सुटीं पानें देहू-कर वहीचीं आहेत आणि देहूकर वही ११२ व्या अभंगापासून सुरू होते, असें श्री. परांजपे म्हणतात; पण १०८–११८ हे अभंग एका सुट्या पानां-तील आहेत, हेंहि नमूद करतात. तेव्हां येथें १०८-११८ हा आंकडा तरी चुकला असला पाहिजे किंवा सुटें पान व देहूकर-वही यांतील ११२ ते ११८ हे अभंग दुबार होत असले पाहिजेत. दुबार होत असल्यास तें पान त्या वहीचें नसण्याचा संभव आहे. ३५४–३५७ हे पांचच अभंग एका पाना-वर असतील, तर त्या पानाची निदान दुसरी बाजू तरी कोरी असली पाहिजे. पण ती बाजू लिहि लेली असेल, तर त्या बाजूवरचे अभंग दुबार होतील. एक बाजू कोरी ठेवण्याची किंवा दुबार अभंग लिहिण्याची आवश्यकता माझ्या ध्यानीं येत नसल्यानें हेंहि पान श्री. परांजपे यांस मिळालेल्या वहीचें नसावें, असें त्यांनीं दिलेल्या माहितीवरूनच सिद्ध होईल.

"देहूकर-वही व सख्याहरी-वही यांतील ओळ अथवा क्रम एकच आहे; फक्त सख्याहरी वहींत अभंग अधिक आहेत. पण देहूकर वहीची नकल करतांना सख्याहरी वहींत देहूकर वहींतील कांहीं अभंग नकलावयाचे राहिल्यानें गळले आहेत. तथापि या पुस्तकांत अभंग छापतांना देहूकर वहींतील अभंग दोन तारकांनीं दाखविले आहेत" इत्यादि श्री. परांजपे म्हणतात. हें खरें असेल, तर काय निष्पन्न होतें, तें पाहा. तारकांकित अभंगांपैकीं पहिला १०८ व शेवटचा ४३६ आहे. यांमधील ३२९ अभंगां-पैकीं १३९–१४६, २३३, ३४९–३५३, ३६५–३७२, ३९२–३९६, ३९८–४३१ अशा सहा ठिकाणच्या (८+१+५+८+६+३४=) ६१ अभंगांना उपर्युक्त खूण नसल्यानें हे अभंग देहूकर वहींत नाहींत, गळले आहेत; म्हणजे देहूकर वही त्रुटित आहे. अर्थात् तिची ओळहि तेवढी खंडित

# श्रीतुकोबारायांच्या अभंगांचा मूळ पाठ ?

आहे, असें समजलें पाहिजे. आणि सख्याहरीच्या वहींत पुष्कळ गळागळ झाल्याचें श्री. परांजपे कबूल करतात. एवढेंच नव्हे तर, तीमधील ओळ साधण्यासाठीं त्यांनीं २८ अभंग पंडिती प्रतींतून, १६ जगनाडी गाथेंतून व २७ देहूकर वहींतून असे ७१ अभंग उसने घेतले आहेत. तेव्हां सख्याहरी-वही व तिची ओळ दोन्ही त्रुटित आहेत, असें समजणें भागच आहे. शिवाय २३३ अ हा अभंग देहूकर वहींत नाहीं, असें श्री. परांजपे म्हणतात. पण छापतांना त्यावर दोन तारे घालून तो देहूकर वहींत आहे, असें सुचवितात. तेव्हां यांपैकीं खरें कोणतें ? ४५२ अ या अभंगाचा कोठेंच खुलासा नाहीं असें कां ? त्यांतल्या त्यांत २३३, २४९-२५३ (=५), ३९२-३९६ (=५) हे अभंग कसे गळावे ? श्री. परांजपे यांच्या म्हणण्याप्रमाणें पूर्ण पान प्रसाद म्हणून गेल्यास ७८ अभंगांची उणीव भासावी. पांच अभंग पानाच्या एकाच बाजूवर मावतील. म्हणजे दुसरी बाजू कोरीच राहील. देहूकर वहींत अशा कोऱ्या बाजू असल्याचें परांजपे सांगत नाहींत. तात्पर्य, येथूनतेथून सर्व गोंधळ झाल्यानें श्री. परांजपे यांचें म्हणणेंच समजत नाहीं.

श्री. परांजपे यांनीं प्रस्तावनेच्या १११–११३ पानांवर 'देहूकरांच्या वहींतील अक्षरें, शब्द व आजचीं अक्षरें, शब्द यांमधील फरक दाखविणारा तक्ता' दिला आहे. पण याचा कसा उपयोग करावयाचा, हें मला तरी समजत नाहीं. आज प्रकाशित असलेल्या कोणत्याहि गाथेंतील अभंग घेऊन त्यांत या तक्त्याप्रमाणें बदल केले, तर देहूकरांच्या वहींतील पाठ तयार होईल, असें त्यांचें म्हणणें असेल, तर तें अशक्य आहे. एवढेंच नव्हे, तर सख्याहरीच्या वहींतील पाठ घेऊन त्यांत या तक्त्याप्रमाणें बदल केले, तरीही देहूकर वहींतील पाठ मिळणें अशक्य आहे. या तक्त्यांत शब्द व अक्षरें यांतील कांहीं बदल दिले आहेत. रूपें व अनुस्वारदानपद्धति यांतील बदलांविषयीं कांहींच सांगितलेलें नाहीं आणि असे बदल तर सख्याहरीच्या वहींत शेंकडों आहेत. उदाहरणार्थ, छायाचित्रांतील पांच अभंगांतच पुढील महत्त्वाचे बदल असून तक्त्यावरून त्यांचा कांहींच खुलासा होत नाहीं.

| देहूकर-वही | सख्याहरी-वही |
|---|---|
| जीव | भाव |
| शुद | शुध |
| आधीकारी | अधिकारीं |
| वीसावलें | वीसांवलें |
| पाई | पांई |
| आले | आलें |
| हें | हे |
| माझें | माझे |
| जीवा | देवा |
| जोडूनीया | जोडोनीया |
| पुरें | पुरे |
| धणीं | धणी |
| कळवळ | कळवळा |
| भेटों | भेटो |
| ब्रुंद | वृंद |
| तो | तों |
| संतीं | संती |
| केलों | केलो |
| मोनें | मोनें |

यावरून एवढें दिसून येईल कीं, श्री. परांजपे यांनीं दिलेला तक्ता शोभेचा पण निकामी आहे.

श्री. परांजपे यांनीं आपल्या पुस्तकांत ओळीस फार महत्त्व दिलें आहे. ज्या क्रमानें तुकोबास अभंग स्फुरून ते लिहिले गेले ती ओळ, ती माळ, तो क्रम असा अर्थ श्री. परांजपे देतात व या ओळीकडे बहुतेक गाथाप्रकाशकांनीं लक्ष दिलें नाहीं, ही गोष्ट परीस टाकून कांच पदरांत घ्यावी तशी झाली, असें श्री. परांजपे म्हणतात. तेव्हां या ओळीचा अधिक विचार करणें आवश्यक आहे. माझ्या मतानें तुकाराम एकाद्या पढिक ग्रंथकाराप्रमाणें अनेक ग्रंथांचें साहाय्य घेत घेत अभंगाची रचना करीत नसावा. त्यानें केलेली शब्दयोजना पाहिली, तर त्यानें शेंकडों संस्कृत व प्राकृत ग्रंथ अवलोकिले असले पाहिजेत, असें वाटतें. पण त्यानें केलेल्या अभंगांचा जन्म कधीं सहज स्फूर्तींत, कधीं बाह्य निमित्तानें, कधीं सहेतुक, कधीं भक्त्युत्कर्षांत, असा विविध प्रकारें झाला आहे. यामुळें त्यानें एकाच विषयावर अनेकदां व एकाच वेळीं



अनुक्रमणिका



राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

अनेकांगांवर अभंग केले असले पाहिजेत. तेव्हां त्याच्या एकूण एक अभंगांना विशिष्ट अनुक्रम पूर्वी कधीं लावला गेला नसेल व आतांहि लावणें योग्य नाहीं. एवढेंच नव्हे तर, लावला तरीहि तो वस्तुस्थितिनिदर्शक होईल, असें वाटत नाहीं. परंतु दहापांच दहापांच अभंगांच्या तुकड्यांत सुसूत्रता, सलगता, विशिष्ट क्रम, पौर्वापर्य किंवा ओळ असणें अगदीं शक्य आहे. तुकारामाच्या सर्व अभंगांची ओळ अशा तऱ्हेनें समजली तर पाहिजेच. पण तिला अवास्तव महत्त्व देऊन तिजकरितां अडून बसणें योग्य नव्हे किंवा तिच्या साठीं आटापीट करण्याची जरुरी नाहीं. एकादा प्रतिभाशाली अभ्यासू तुकारामाच्या अभंगांस खुद्द तुकारामापेक्षांहि अधिक समर्पक अशी ओळ लावून दाखवूं शकेल. स्वतः श्री. परांजपे यांनीं या पुस्तकांत कांहीं ठिकाणीं ( १४५ व्या अभंगाबाबत निश्चित व मधेंमधें खुणा नसलेल्या अभंगाबाबत संशयित ) असें केलें आहे. त्याकरितां त्यांनीं बाहेरचे कांहीं अभंग घेतल्याचें दिसतें. याचा अर्थ असा कीं, श्री. परांजपे यांच्या मतानें तुकारामाच्या हातची अशी जी वही तीमध्येंच ओळ राखली गेली नाहीं. मग इतरत्र राखली गेली नाहीं, याच्यांत आश्चर्य कसलें ? व त्या ओळीचा एवढा बाऊ कशाला ?

ओळीला महत्त्व किती द्यावयाचें, ती कितपत मिळणें शक्य आहे इत्यादि मुद्द्यांचा निर्णय करणें सोपें जावें म्हणून मी येथें संताजी जगनाडे वहींतील अभंग व प्रस्तुत पुस्तकांतील अभंग यांच्या ओळींची तुलना करून दाखवितों. संताजी जगनाडे हा कीर्तन-निरूपण-भजन-प्रसंगीं तुकारामाच्या मागें उभ्या राहणाऱ्या चौदा टाळकऱ्यांपैकीं एक असून, त्यानें उतरून घेतलेल्या तुकारामाच्या अभंगांपैकीं दोन वह्यांतील मिळून सुमारें १३०० अभंग कै. वि. ल. भावे यांनीं शके १८४१-४२ मध्यें प्रकाशित केले आहेत. हे अभंग उतरण्याचें काम श. १५६८ आश्विनांत संपलें व तदनंतर अदमासें साडेतीन वर्षांनीं तुकाराम वारला. तेव्हां तदनंतर निदान ३९ वर्षें तरी संताजी हयात होता. तेव्हां त्यास तुकारामाचें सारें कवित्व माहीत होतें. एवढेंच नव्हे तर, त्याची ओळही त्यास ठाऊक असलीच पाहिजे. या दृष्टीनें या तुलनेंत फार अर्थ भरला आहे.

संताजीसंहितेंत १३२३ तर श्री. परांजपे यांनीं दिलेल्या सख्याहरी व देहूकर जोडसंहितेंत ७५३ अभंग आहेत. पैकीं दुसरींत ( जोडसंहितेंत ) १६ संताजीसंहितेंतून व २८ पंडिती प्रतीमधून घेतल्यामुळें या दुसऱ्या संहितेंत ७०९ च अभंग शिल्लक राहतात. यांपैकीं दोन्हीकडे असलेले अभंग ८९ आहेत. यांत समक्रम अभंगांचे गट १३ व अभंग ४५ आहेत; पैकीं ८ गट प्रत्येकीं दोन अभंगांचे, २ गट प्रत्येकीं ४ अभंगांचे, २ गट प्रत्येकीं ९ अभंगांचे, व १ गट ३ अभंगांचा आहे. १३ गटांपैकीं देहूकर वहीच्या ६ गटांत १९ व सख्याहरी वहीच्या सात गटांत २६ अभंग समक्रम आहेत. शिवाय दोन्ही संहितेंतील आनुपूर्वी एकमेकांशीं जुळती नसून अगदीं भिन्न आहे, हेंहि लक्षांत घेण्यासारखें आहे. अगोदर देहूकर व सख्याहरी या दोन्ही वह्यांत ओळ एकसंधी नसून जागोजाग तुटलेली आहे, हें मी मागें दाखविलें आहे आणि आतां ती तुटक ओळ आणि संताजीसंहितेची ओळ यांच्यांत लक्षांत घेण्यासारखी एकरूपता मुळींच नाहीं, हें खालील कोष्टकावरून उत्तम ध्यानांत येईल :

| गट | अभंग-संख्या | जोडसंहिता | संताजीसंहिता |
|---|---|---|---|
| १ | ९ | ७३– ८१ | ३२२– ३३० |
| २ | २ | १०९-११० | १९२– १९३ |
| ३ | २ | १६१–१६२ | २४६– २४७ |
| ४ | ९ | २३५–२४३ | ९३६– ९४४ |
| ५ | २ | २४५–२४६ | ९४७– ९४८ |
| ६ | २ | २९६–२९७ | २३१– २३२ |
| ७ | २ | ३०४–३०५ | ४७७– ४७८ |
| ८ | २ | ४१६–४१७ | ११३६–११३७ |
| ९ | ४ | ४४०–४४३ | ८४– ८७ |
| १० | ३ | ४७७–४७९ | ८९– ९१ |
| ११ | २ | ५०२–५०३ | २७७– २७८ |
| १२ | २ | ५१०–५११ | २६१– २६२ |
| १३ | ४ | ६८६–६८९ | ६८४– ६८७ |








देहूकर-वही तुकारामाच्या हातची आहे, असें श्री. परांजपे मानतात. संताजी जगनाडे गाथेस ओळीच्या दृष्टीनें फार महत्त्व आहे, हेंहि ते कबूल करतात. मग दोघांची ओळ कां जुळूं नये ? आणि आनुपूर्वी निराळी कां व्हावी ? परांजपे यांनीं ही समस्या सोडून दाखविली पाहिजे. जगनाडेसंहितेंत मधून मधून ओळीचे आंकडे आहेत आणि श्री. परांजपे यांच्या विधानाप्रमाणें तसे देहूकर वहींत नाहींत, हेंहि लक्षांत ठेवण्यासारखें आहे. यावरून हेंच सिद्ध होतें कीं, तुकारामाच्या अभंगांत मूलतः फुटकळपणा आहे, फार मोठा क्रम किंवा ओळ नाहीं. यामुळें ओळीस अवास्तव महत्त्व देणें उचित नाहीं. मला आणखी एक प्रश्न श्री. परांजपे यांना विचारावयाचा आहे. त्यांनीं अभंगांचा अर्थ करतांना एकदंर ७५३ अभंगांमध्यें निदान ३७ ठिकाणीं ओघ म्हणजेच ओळ बदलल्याची कबुली दिली आहे. आणि त्यांची ही ओघबदली कांहीं ठिकाणीं १।१,२।२ अभंगांवरची झाली आहे. असें आहे तर, श्री. परांजपे यांची ओळ म्हणजे १०।१०, ५।५ अभंगांच विशिष्टानुक्रमी गट एवढाच अर्थ निष्पन्न होतो ना ? मग त्या ओळीला अवास्तव महत्त्व देण्यांत स्वारस्य तें काय राहिलें ?

श्री. परांजपे आपण अभंगांचें शब्दशः भाषांतर केलें आहे, असें म्हणतात; पण मला तें खरें वाटत नाहीं. तुकाराम बहुसंख्य कवींप्रमाणें हेतुपूर्वक अभंगरचना करावयास बसत असेल, असें वाटत नाहीं. प्रक्षोभक विचारांच्या उद्रेकांतून प्रायः तुकारामाची अभंगवाणी प्रसवली आहे. यामुळें शेंकडों अभंगांत गूढता भरलेली आहे. तिचा उकल करावयाचा तर, अभंगांच्या अन्वयार्थांत ठिकठिकाणीं शब्द व विचार अध्याहृत घेतले पाहिजेत. ते घ्यावेहि. तरीहि येथें शब्दशः भाषांतर याचा अर्थ, अभंगाचा अन्वय लावून व तो अर्थवाही होण्यासाठीं आवश्यक ते शब्द व विचार उसने घेऊन केलेलें अभंगशब्दावलंबी भाषांतर, असा मी समजतों. तसा अर्थ या पुस्तकांत आहे का ? नाहीं, अशी माझी खात्री आहे.

शब्दशः अर्थ करावयाचा, तर कठीण शब्दांचें अर्थ स्पष्ट करणें आवश्यक होतें. पण श्री. परांजपे यांनीं तसें कोठें केल्याचें आढळत नाहीं. एक तर, बरेचसे दुर्बोध शब्द आहेत तसेच ठेविले आहेत, किंवा त्यांस पारंपरिक अगर चुकीचे अर्थ दिले आहेत. उदाहरणार्थ, हांडोरिया, भगपाळ, बरग, लिगाडलिगाडी, डौरला, काचाकुची, बासर, उजूर, भाड्या, कातर, कुरवंडी, आरोनी, खोळ, लाठी, घोंगें, गदारोळ, भांड, असुक, वायचाळा, पोमाळितां, लासेफासे, सळे, ठाकणी, टाकमटिका इत्यादि अनेक शब्द पाहावे. त्यांनीं बहुतेक शब्दांचे अर्थ पंडिती प्रतींतून उतरून घेतले आहेत आणि पंडितांनीं कित्येक अर्थ हंस व मोल्सवर्थ या कोशांतून घेतले आहेत तर कित्येक त्यांनीं संदर्भाशीं जुळतात म्हणून दिलेले दिसतात. केवळ अशा अर्थांवर विसंबण्याचे दिवस गेले. आतां व्युत्पत्तिसिद्ध अर्थ दिले, तरच अभ्यासांत प्रगति केल्यासारखें होईल. एरवीं नाहीं.

\ येथवर केलेल्या विवेचनाचें तात्पर्य हें कीं, श्री. परांजपे यांनीं देहूकर वही व दोन सुटीं पानें यांचा यथास्थित पाठ दिला नसल्यानें तुकारामाच्या अभंगांचा त्यांच्या मतानें मूळचा पण माझ्या मतें मूळाजवळचा पाठ मिळाला नाहीं. \

मनोदय प्रकट करण्याचें सम्यक्प्रयुक्त शब्द हेंच एकमेव साधन असल्यानें तुकारामाच्या मूळ शब्दांतून ज्याचा आविष्कार होईल तेंच त्यांचें खरें तत्त्वज्ञान समजलें पाहिजे. तुकारामाच्या अभंगांचा तो मूळ पाठ या पुस्तकानें मिळाला नसून तो अजून मिळावयाचा आहे. त्यासाठीं प्रयत्न केला पाहिजे हेंच या पुस्तकाच्या प्रकाशनानें सिद्ध होतें.

इतकें सर्व असलें तरी, मला श्री. परांजपे यांस एकदोन सूचना करावयाच्या आहेत. त्या अशा : ( १ ) शक्य तर श्री. बाबासाहेब देहूकर यांचें मन वळवून त्यांची वही व स्वतःजवळचीं दोन सुटीं पानें एकाद्या संशोधनसंस्थेंत सुरक्षित ठेवून द्यावी. ( २ ) दोघांच्याहि ८।१० फिल्मा व फोटोरेजिस्ट्री प्रती काढून त्या शोधसंस्थांत संस्थांच्या खर्चानें ठेवण्याचा प्रयत्न करावा. बहुतेक शोधसंस्था ही गोष्ट आनंदानें कबूल करतील. ( ३ ) केवळ देहूकर-वही व दोन सुटीं पानें यांचा पाठ अक्षरतज्ज्ञांकडून तपासून घेऊन मुळाबरहुकूम प्रसिद्ध करावा म्हणजे लोकांस थोडक्या खर्चांत अमोल ठेवा मिळेल.

---

अनेकांगांवर अभंग केले असले पाहिजेत. तेव्हां त्याच्या एकूण एक अभंगांना विशिष्ट अनुक्रम पूर्वी कधीं लावला गेला नसेल व आतांहि लावणें योग्य नाहीं. एवढेंच नव्हे तर, लावला तरीहि तो वस्तुस्थितिनिदर्शक होईल, असें वाटत नाहीं. परंतु दहापांच दहापांच अभंगांच्या तुकड्यांत सुसूत्रता, सलगता, विशिष्ट क्रम, पौर्वापर्य किंवा ओळ असणें अगदीं शक्य आहे. तुकारामाच्या सर्व अभंगांची ओळ अशा तऱ्हेनें समजली तर पाहिजेच. पण तिला अवास्तव महत्त्व देऊन तिजकरितां अडून बसणें योग्य नव्हे किंवा तिच्या साठीं आटापीट करण्याची जरुरी नाहीं. एकादा प्रतिभाशाली अभ्यासू तुकारामाच्या अभंगांस खुद्द तुकारामापेक्षांहि अधिक समर्पक अशी ओळ लावून दाखवूं शकेल. स्वतः श्री. परांजपे यांनीं या पुस्तकांत कांहीं ठिकाणीं ( १४५ व्या अभंगाबाबत निश्चित व मधेंमधें खुणा नसलेल्या अभंगाबाबत संशयित ) असें केलें आहे. त्याकरितां त्यांनीं बाहेरचे कांहीं अभंग घेतल्याचें दिसतें. याचा अर्थ असा कीं, श्री. परांजपे यांच्या मतानें तुकारामाच्या हातची अशी जी वही तीमध्येंच ओळ राखली गेली नाहीं. मग इतरत्र राखली गेली नाहीं, याच्यांत आश्चर्य कसलें ? व त्या ओळीचा एवढा बाऊ कशाला ?

ओळीला महत्त्व कितीं द्यावयाचें, ती कितपत मिळणें शक्य आहे इत्यादि मुद्द्यांचा निर्णय करणें सोपें जावें म्हणून मी येथें संताजी जगनाडे वहींतील अभंग व प्रस्तुत पुस्तकांतील अभंग यांच्या ओळींची तुलना करून दाखवितों. संताजी जगनाडे हा कीर्तन-निरूपण-भजन-प्रसंगीं तुकारामाच्या मागें उभ्या राहणाऱ्या चौदा टाळकऱ्यांपैकीं एक असून, त्यानें उतरून घेतलेल्या तुकारामाच्या अभंगांपैकीं दोन वह्यांतील मिळून सुमारें १३०० अभंग कै. वि. ल. भावे यांनीं शके १८४१-४२ मध्यें प्रकाशित केले आहेत. हे अभंग उतरण्याचें काम श. १५६८ आश्विनांत संपलें व तदनंतर अदमासें साडेतीन वर्षांनीं तुकाराम वारला. तेव्हां तदनंतर निदान ३९ वर्षें तरी संताजी हयात होता. तेव्हां त्यास तुकारामाचें सारें कवित्व माहीत होतें. एवढेंच नव्हे तर, त्याची ओळही त्यास ठाऊक असलीच पाहिजे. या दृष्टीनें या तुलनेंत फार अर्थ भरला आहे.

संताजीसंहितेंत १३२३ तर श्री. परांजपे यांनीं दिलेल्या सख्याहरी व देहूकर जोडसंहितेंत ७५३ अभंग आहेत. पैकीं दुसरींत ( जोडसंहितेंत ) १६ संताजीसंहितेंतून व २८ पंडिती प्रतीमधून घेतल्यामुळें या दुसऱ्या संहितेंत ७०९ च अभंग शिल्लक राहतात. यांपैकीं दोन्हींकडे असलेले अभंग ८९ आहेत. यांत समक्रम अभंगांचे गट १३ व अभंग ४५ आहेत; पैकीं ८ गट प्रत्येकीं दोन अभंगांचे, २ गट प्रत्येकीं ४ अभंगांचे, २ गट प्रत्येकीं ९ अभंगांचे, व १ गट ३ अभंगांचा आहे. १३ गटांपैकीं देहूकर वहीच्या ६ गटांत १९ व सख्याहरी वहीच्या सात गटांत २६ अभंग समक्रम आहेत. शिवाय दोन्ही संहितेंतील आनुपूर्वी एकमेकांशीं जुळती नसून अगदीं भिन्न आहे, हेंहि लक्षांत घेण्यासारखें आहे. अगोदर देहूकर व सख्याहरी या दोन्ही वह्यांत ओळ एकसंधी नसून जागोजाग तुटलेली आहे, हें मी मागें दाखविलें आहे. आणि आतां ती तुटक ओळ आणि संताजीसंहितेची ओळ यांच्यांत लक्षांत घेण्यासारखी एकरूपता मुळींच नाहीं, हें खालील कोष्टकावरून उत्तम ध्यानांत येईल :

| गट | अभंग-संख्या | जोडसंहिता | संताजीसंहिता |
|---|---|---|---|
| १ | ९ | ७३– ८१ | ३२२– ३३० |
| २ | २ | १०९–११० | १९२– १९३ |
| ३ | २ | १६१–१६२ | २४६– २४७ |
| ४ | ९ | २३५–२४३ | ९३६– ९४४ |
| ५ | २ | २४५–२४६ | ९४७– ९४८ |
| ६ | २ | २९६–२९७ | २३१– २३२ |
| ७ | २ | ३०४–३०५ | ४७७– ४७८ |
| ८ | २ | ४१६–४१७ | ११३६–११३७ |
| ९ | ४ | ४४०–४४३ | ८४– ८७ |
| १० | ३ | ४७७–४७९ | ८९– ९१ |
| ११ | २ | ५०२–५०३ | २७७– २७८ |
| १२ | २ | ५१०–५११ | २६१– २६२ |
| १३ | ४ | ६८६–६८९ | ६८४– ६८७ |










## श्रीतुकोबारायांच्या अभंगांचा मूळ पाठ?

देहूकर-वही तुकारामाच्या हातची आहे, असें श्री. परांजपे मानतात. संताजी जगनाडे गाथेस ओळीच्या दृष्टीनें फार महत्त्व आहे, हेंहि ते कबूल करतात. मग दोघांची ओळ कां जुळूं नये? आणि आनुपूर्वी निराळी कां व्हावी? परांजपे यांनीं ही समस्या सोडून दाखविली पाहिजे. जगनाडेसंहितेंत मधून मधून ओळीचे आंकडे आहेत आणि श्री. परांजपे यांच्या विधानाप्रमाणें तसे देहूकर वहींत नाहींत, हेंहि लक्षांत ठेवण्यासारखें आहे. यावरून हेंच सिद्ध होतें कीं, तुकारामाच्या अभंगांत मूलतः फुटकळपणा आहे, फार मोठा क्रम किंवा ओळ नाहीं. यामुळें ओळीस अवास्तव महत्त्व देणें उचित नाहीं. मला आणखी एक प्रश्न श्री. परांजपे यांना विचारावयाचा आहे. त्यांनीं अभंगांचा अर्थ करतांना एकंदर ७५३ अभंगांमध्यें निदान ३७ ठिकाणीं ओघ म्हणजेच ओळ बदलल्याची कबुली दिली आहे. आणि त्यांची ही ओघबदली कांहीं ठिकाणीं ११,२।२ अभंगांवरची झाली आहे. असें आहे तर, श्री. परांजपे यांची ओळ म्हणजे १०।१०, ५।५ अभंगांच विशिष्टानुक्रमी गट एवढाच अर्थ निष्पन्न होतो ना? मग त्या ओळीला अवास्तव महत्त्व देण्यांत स्वारस्य तें काय राहिलें?

श्री. परांजपे आपण अभंगांचें शब्दशः भाषांतर केलें आहे, असें म्हणतात; पण मला तें खरें वाटत नाहीं. तुकाराम बहुसंख्य कवींप्रमाणें हेतुपूर्वक अभंगरचना करावयास बसत असेल, असें वाटत नाहीं. प्रक्षोभक विचारांच्या उद्रेकांतून प्रायः तुकारामाची अभंगवाणी प्रसवली आहे. यामुळें शेंकडों अभंगांत गूढता भरलेली आहे. तिचा उकल करावयाचा तर, अभंगांच्या अन्वयार्थांत ठिकठिकाणीं शब्द व विचार अध्याहृत घेतले पाहिजेत. ते घ्यावेहि. तरीहि येथें शब्दशः भाषांतर याचा अर्थ, अभंगाचा अन्वय लावून व तो अर्थवाही होण्यासाठीं आवश्यक ते शब्द व विचार उसने घेऊन केलेलें अभंगशब्दाव-लंबी भाषांतर, असा मी समजतों. तसा अर्थ या पुस्तकांत आहे का? नाहीं, अशी माझी खात्री आहे.

शब्दशः अर्थ करावयाचा, तर कठीण शब्दांचें अर्थ स्पष्ट करणें आवश्यक होतें. पण श्री. परांजपे यांनीं तसें कोठें केल्याचें आढळत नाहीं. एक तर, बरेचसे दुर्बोध शब्द आहेत तसेच ठेविले आहेत, किंवा त्यांस पारंपरिक अगर चुकीचे अर्थ दिले आहेत. उदाहरणार्थ, हांडोरिया, भगपाळ, बरग, लिगाड-लिगाडी, डौरला, काचाकुची, वासर, उजूर, माड्या, कातर, कुरवंडी, आरोनी, खोळ, लाठी, घोंगें, गदारोळ, भांड, अमुक, वायचाळा, पोमाळितां, लासिफासे, सळे, ठाकणी, टाकमटिका इत्यादि अनेक शब्द पाहावे. त्यांनीं बहुतेक शब्दांचे अर्थ पंडिती प्रतींतून उतरून घेतले आहेत आणि पंडितांनीं कित्येक अर्थ हंस व मोल्सवर्थ या कोशांतून घेतले आहेत तर कित्येक त्यांनीं संदर्भाशीं जुळतात म्हणून दिलेले दिसतात. केवळ अशा अर्थांवर विसंब-ण्याचे दिवस गेले. आतां व्युत्पत्तिसिद्ध अर्थ दिले, तरच अभ्यासांत प्रगति केल्यासारखें होईल. एरवीं नाहीं.

\ येथवर केलेल्या विवेचनाचें तात्पर्य हें कीं, श्री. परांजपे यांनीं देहूकर वही व दोन सुटीं पानें यांचा यथास्थित पाठ दिला नसल्यानें तुकारामाच्या अभंगांचा त्यांच्या मतानें मूळचा पण माझ्या मतें मूळाजवळचा पाठ मिळाला नाहीं. \

मनोदय प्रकट करण्याचें सम्यक्प्रयुक्त शब्द हेंच एकमेव साधन असल्यानें तुकारामाच्या मूळ शब्दांतून ज्याचा आविष्कार होईल तेंच त्यांचें खरें तत्त्वज्ञान समजलें पाहिजे. तुकारामाच्या अभंगांचा तो मूळ पाठ या पुस्तकानें मिळाला नसून तो अजून मिळावयाचा आहे. त्यासाठीं प्रयत्न केला पाहिजे हेंच या पुस्तकाच्या प्रकाशनानें सिद्ध होतें.

इतकें सर्व असलें तरी, मला श्री. परांजपे यांस एकदोन सूचना करावयाच्या आहेत. त्या अशा: (१) शक्य तर श्री. नानासाहेब देहूकर यांचें मन वळवून त्यांची वही व स्वतःजवळचीं दोन सुटीं पानें एकाद्या संशोधनसंस्थेंत सुरक्षित ठेवून द्यावी. (२) दोघांच्याहि ८।१० फिल्मा व फोटोरेजिस्ट्री प्रती काढून त्या शोधसंस्थांत संस्थांच्या खर्चानें ठेवण्याचा प्रयत्न करावा. बहुतेक शोधसंस्था ही गोष्ट आनंदानें कबूल करतील. (३) केवळ देहूकर-वही व दोन सुटीं पानें यांचा पाठ अक्षरतज्ज्ञां-कडून तपासून घेऊन मुळाबरहुकूम प्रसिद्ध करावा म्हणजे लोकांस थोडक्या खर्चांत अमोल ठेवा मिळेल.








श्री. प्रभाकर माचवे

# प्रयागची 'साहित्यकारसंसद्'

अलाहाबाद शहरापासून पांच मैलांवर गंगा-किनारीं रसूलाबाद खेड्याच्या टोंकाशीं एक लहानशीं इमारत आहे. तिच्या रूपानें श्रीमती महादेवी वर्मा यांचें 'हिंदी साहित्यकार–संसद्' विषयीचें स्वप्न अंकुररूपानें साकार झालें आहे. या संस्थेची स्थापना १९४५ सालीं झाली. या संस्थेचें उद्देश्यपत्र असें : ( १ ) हिंदी साहित्यिकांमध्यें परस्पर सक्रिय सहयोग स्थापित करून त्यांच्यामध्यें पारस्परिक सौहार्द वाढविणें, त्यांची साहित्यसृष्टि व सांस्कृतिक चेतना यांना अनुरूप अशी परिस्थिति व क्षेत्र निर्माण करणें. ( २ ) रुग्ण व साहित्यसेवेला असमर्थ अशा साहित्यिकांसाठीं एक साहाय्यनिधि निर्माण करणें, ज्यांतून त्यांच्या शुश्रूषेची व औषधपाण्याची व्यवस्था होऊं शकेल. ( ३ ) लेखकांच्या हिताचें रक्षण आणि त्यांच्यावर होणाऱ्या अन्यायाचा विरोध व प्रतिकार. ( ४ ) उत्तम साहित्याच्या प्रसिद्धीकरणाची व्यवस्था. या व्यवस्थेमुळें साहित्यिकांना निश्चित मासिक उत्पन्न मिळूं शकेल, आणि साहाय्य-निधींतहि उत्तरोत्तर वृद्धि होईल. ( ५ ) उत्तम ग्रंथालयानें युक्त अशा साहित्य-कला-केंद्राची स्थापना, या केंद्रांत राहून साहित्यिकांना व कलावंतांना साहित्य-कलासृष्टीस आवश्यक सोय व तद्विषयक विचार-प्रसाराचीं साधनें मिळूं शकतील. ( ६ ) उत्कृष्ट आधुनिक व प्राचीन साहित्य व विचारसंपदा यांच्या प्रकाशनासाठीं 'साहित्यकार' नांवाचें त्रैमासिक काढणें. ( ७ ) प्रयाग किंवा प्रयागबाहेरच्या समान उद्देश्यांच्या संस्थांशीं व व्यक्तींशीं संबंध ठेवणें व त्यांना संयुक्त करून घेणें. ( ८ ) संसदेच्या उद्देश्यांची प्रगति व सिद्धि यांसाठीं आवश्यक अशा अन्य सर्व साधनांचा उपयोग करणें.

या दृष्टीनें या संस्थेंत सर्वश्री मैथिलीशरण गुप्त, माखनलाल चतुर्वेदी, गुलाबराय, रायकृष्णदास, सियारामशरण गुप्त, भदंत आनंद कौसल्यायन, इलाचंद्र जोशी हे संस्थेचे अंतरंगसदस्य आहेत. श्रीमती महादेवी वर्मा संस्थेच्या प्रमुख मंत्री आहेत. एक उत्तम संदर्भग्रंथालय, स्वाध्यायमंदिर, संघायतन ( हॉल ) व संग्रहालय हीं स्थापण्याचा या संस्थेचा विचार असून कांहीं उत्कृष्ट अनुवादसाहित्य छापण्याचाहि त्यांचा आराखडा आहे : ऋग्वेदांतील कांहीं निवडक सूक्तांचा सचित्र अनुवाद, थेरगाथा व थेरीगाथा यांचा दोन खंडांत अनुवाद, वाल्मीकिरामायणाचा छंदोबद्ध सचित्र अनुवाद आणि रघुवंशाचा पद्यबद्ध अनुवाद. या अनुवादांपैकीं बरेचसें साहित्य स्वतः महादेवी वर्मा यांनीं निर्मिलें असून तें अजून अप्रसिद्ध असें आहे.

साहित्यकारसंसदेला उत्तर–प्रदेश व बिहार प्रांतांच्या सरकारांच्या वतीनें कांहीं रक्कम दरसाल मिळते. याशिवाय साहु जगदीशप्रसाद पुरस्कारनिधि म्हणून १०,००० रु. आहेत. त्यांतून गतवर्षी रामधारीसिंह 'दिनकर' यांच्या 'कुरुक्षेत्र' महाकाव्याला एक हजाराचें व यंदा वृंदावनलाल वर्मा यांच्या 'मृगनैनी' नांवाच्या ऐतिहासिक कादंबरीला एक हजार अशीं बक्षिसें देण्यांत आलीं. या संस्थेच्या प्रयत्नांमुळेंच 'निराला' वगैरेंचे बरेचसे कॉपीराईट, जे प्रकाशकांना त्यांनीं आर्थिक टंचाईमुळें विकून टाकले होते, ते त्यांना परत देण्यांत आले.

या संस्थेचा सहावा वार्षिकोत्सव यंदा २०,२१








व २२ फेब्रुवारी रोजीं साजरा करण्यांत आला. पहिल्या दिवशीं राष्ट्रपति डॉ. राजेंद्रप्रसाद यांनीं या संस्थेंत एका ' वाणीमंदिरा 'चा शिलान्यास केला. मैथिलीशरण गुप्तांनीं त्यांचें स्वागत करून आपल्या छोटेखानशा भाषणांत म्हटलें कीं, " लेखक हा लक्ष्मीचा दास कधींच होऊं शकत नाहीं, तो भावाचा भुकेला असतो. " या प्रसंगीं राष्ट्रपतींनीं आपल्या लिखित भाषणांत खऱ्या वाङ्मयाच्या गुणांची चर्चा केली. त्यांतील कांहीं मुद्द्यांचा आशय पुढें देत आहे :

" परमेश्वरानें आपणां साहित्यिकांस अशी शक्ति दिली आहे कीं, जिच्या योगानें आपल्या इतर बंधु-भगिनींसमोर असलेले प्रश्न आपण सुस्पष्ट आणि जिवंत शब्दांत व्यक्त करूं शकतां, त्याचबरोबर आपण आपल्या देशबांधवांना अशी प्रेरणा देऊन मार्गदर्शन करूं शकतां कीं, ज्यामुळें त्यांना प्रकाश आणि उत्साह प्राप्त होऊन आपल्या समोरील समस्या सोडविण्याचें सामर्थ्य व धैर्य प्राप्त होईल... आपल्या देशामधील कोट्यवधि नरनारींचें जीवन आज वैफल्यपूर्ण आणि हलाखीचें झालें आहे. ही स्थिति सुधारण्याकरितां राजकारणी लोक राजनैतिक दृष्टीनें प्रयत्न करीत आहेत. परंतु ज्या योगानें जनता आपल्या समोरील प्रश्न शीघ्रातिशीघ्र सोडविण्याच्या कामीं आपल्या सर्व शक्ती वेंचायला तयार होईल अशी स्फूर्ति, असा उत्साह, अशी तळमळ जनतेमध्यें उत्पन्न करण्याचें सामर्थ्य राजकारणी पुरुषांत नाहीं; यंत्रवैज्ञानिकांमध्येंहि नाहीं. जनतेच्या हृदयांत ही भावना निर्माण करण्याचें सामर्थ्य व काम साहित्यिकांचें आहे...अलीकडे ज्या साहित्यांत वर्ग-कलहाचें वर्णन येतें, ज्यांत शोषित वर्गाला समाजांतील इतर वर्गांशीं संघर्ष करण्याकरितां चिथविलें जातें, अशा साहित्यालाच कांहीं लोक प्रगतिशील साहित्य म्हणतात. माझ्या मतें भारतानें महात्मा गांधींच्या प्रेरणेनें सामाजिक शोषणाचा अंत करावयाच्या एका नवीन पद्धतीचा आविष्कार करून दाखविला आहे. आपण जगांतील एका प्रचंड शक्तीशीं अहिंसात्मक क्रियाशीलतेच्या द्वारें दोन हात करून स्वराज्य मिळविलें, आतां तर रचनात्मक कार्य करावयाची वेळ आली आहे. तेव्हां आपणांमधील वर्गकलहाला हिंसात्मक स्वरूप न देतां सर्वोदयाच्या ध्येयानें संपन्न अशी नवसमाजनिर्मिति करणें आपणांस सोपें जाणार नाहीं का ? ह्या बाबतींत साहित्य साहाय्य करूं शकेल. म्हणूनच ज्यांत नवनिर्मिति आणि नवरचना यांचें आवाहन भरलेलें आहे, अशाच साहित्याची आपणांस आज गरज आहे..."

या समारंभाचें वैशिष्ट्य असें कीं, हिंदींतील अग्रगण्य ज्येष्ठ व श्रेष्ठ कवी-कादंबरीकार-नाटककार-टीकाकार यांच्याबरोबर तरुण लेखकांचीहि मोठी संख्या या उत्सवास हजर होती. हिंदी लेखकां-बरोबरच तेलुगु, बंगाली, मराठी, पंजाबी व उर्दू या भाषांचें साहित्यिकहि या उत्सवास निमंत्रिले होते. उपस्थित लेखकांपैकीं कांहीं नांवें अशीं :

( १ ) तेलुगू—राजकवि महामहोपाध्याय श्रीपाद कृष्णमूर्ति शास्त्री; प्रा. वाराणसी राममूर्ति ' रेणु '

( २ ) बंगाली—डॉ. बालॉईचंद मुखोपाध्याय ' बनफूल '

( ३ ) मराठी—आ. रा. देशपांडे, बा. भ. बोरकर, दि. के. बेडेकर.

( ४ ) पंजाबी—देवेंद्र सत्यार्थी, डॉ. हरदेव बाहरी.

( ५ ) उर्दू—उपेंद्रनाथ ' अश्क ', रघुपतिसहाय ' फिराक ', समशेरबहादुरसिंह.

( ६ ) हिंदी—कवी : सुमित्रानंदन पंत, सूर्यकांत त्रिपाठी ' निराला ', महादेवी वर्मा, रामधारीसिंह ' दिनकर ', ' बच्चन ', ठाकूर गोपालशरणसिंह, मैथिलीशरण गुप्त, सियारामशरण गुप्त, विद्यावती ' कोकिल '. कादंबरीलेखक व लघुकथालेखक : सच्चिदानंद हीरानंद वात्स्यायन ' अज्ञेय ', जैनेंद्रकुमार, वृंदावनलाल वर्मा, रामकृष्णदास, अमृतराय, पहाडी, भैरवप्रसादगुप्त, मोहनसिंह सेंगर, धर्मवीर भारती, शिवरानी प्रेमचंद व भगवतीचरणवर्मा. नाटककार : डॉ. रामकुमार वर्मा व लक्ष्मीनारायण मिश्र. निबंधकार व टीकाकार : डॉ. अमरनाथ झा, डॉ. नगेंद्र, इलाचंद्र जोशी, शांतिप्रिय द्विवेदी, गंगाप्रसाद पांडेय, डॉ. रघुवंश, डॉ. धीरेंद्र वर्मा, भदंत आनंद कौसल्यायन, डॉ. बाबूराम सक्सेना, डॉ. कॅमिल








बुल्के, डॉ. उदयनारायण तिवारी, रामचंद्र टंडन, महात्मा भगवानदीन.

या सर्व लेखकांना तीन दिवस एकत्र भेटण्याचा, परस्पर-विचारविनिमयाचा व आपल्या साहित्यिक दृष्टि-कक्षा विस्तृत बनवण्याची संधी देण्याचा हा योगायोग मोठा अपूर्व होता. प्रथम दिवशीं सकाळीं शिलारोपण करून राष्ट्रपति दुपारीं विमानानें कानपूरला निघून गेले. त्याच दिवशीं सायंकाळीं चार वाजतां ' विश्वशांति व साहित्यकार ' या विषयावर झालेल्या परिसंवादांत, दुसऱ्या दिवशीं सायंकाळीं चार वाजतां कॉपीराइटविषयक चर्चेत, आणि श्री. वृंदावनलाल वर्मा यांना दिलेल्या पारितोषिकाच्या समारंभांत, त्याचप्रमाणें नंतरच्या काव्यसमारोहांत जो कांहीं सार्वजनिक ऊहापोह झाला तो वेगळा. पण त्याहीपेक्षां अधिक सुखद म्हणजे संगम वर नौकायात्रा व कौशांबी–उत्खनन–दर्शन–यात्रा या प्रसंगीं झालेली मनमोकळी, दिलखुलास परस्पर थट्टामस्करी. काव्यशास्त्रविनोदांतून एकमेकांना जवळ येण्याचा मिळालेला हा सुयोग अतिशय सुंदर होता. सर्व भाषांतील साहित्यिकांचे असे मेळावे वारंवार होत गेले, तर कै. मुन्शी प्रेमचंदांनीं भारतीय साहित्यपरिषदेचें स्वप्न अंशतः साकार होईल असें म्हणतां येईल.

पहिल्या दिवशीं झालेल्या परिसंवादात श्रीपाद कृष्णमूर्ति शास्त्री हे अध्यक्ष होते. विषय ' विश्वशांति व साहित्यिक ' हा असल्यामुळें वक्त्यांमध्यें गांधीवादी व समाजवादी-साम्यवादी अशा दोन दृष्टिकोनांतून स्वाभाविकपणें चर्चा झाली. प्रारंभीं बंगालचे कवि व व्यंगकथालेखक ' बनफूल ' यांनीं लिखित भाषणानें चर्चेला उपन्यास केला. त्यांच्या बोलण्याचा रोख असा कीं, " साहित्याला व्यवसाय बनवूं नये. श्रेष्ठ साहित्यिक इतर कांहीं कार्य करून उपजीविका चालवितात; परंतु याचा अर्थ साहित्यिकानें समाजाचें नेतृत्व करूं नये असा नाहीं. साहित्यिक समाजाची करमणूक करणारे विदूषक नव्हेत. ते राजकीय पक्षांचें प्रचारमुख नाहींत. जीवनांतील विसंगतींत खरी सुसंगति साहित्यिकच घडवून आणतील. नवराष्ट्राच्या निर्मितीचेंहि कर्तव्य त्यांचें आहे ", त्यांच्या भाषणानंतर श्री. दि. के. बेडेकर यांनीं हिंदींत भाषण केलें. त्यांनीं सांगितलें कीं, " शांतिमंत्राचा नुसता घोषोच्चार केल्यानें शांति साध्य होत नाहीं. जनमनांतील अशांतीचें मूळ शोधून काढून त्यावर शास्त्रीय उपाययोजना केल्यानेंच खरी शांति मिळवितां येईल. साहित्यिकानें त्या दृष्टीनें आजच्या जनतेच्या सुख-दुःखाशीं समरस होऊन खऱ्या विश्वात्मक मानवी सहानुभूतीनें लेखन करायला हवें व आपली सामाजिक जबाबदारी ओळखायला हवी ".

श्री. बेडेकरांनंतर उर्दू गज्जलकार म्हणून प्रसिद्ध प्रा. ' फिराक ' यांनीं साम्यवादी दृष्टिकोनांतून आपली भूमिका मांडली व जागतिक राजकारणांत लेखकांच्या स्थानाची चर्चा केली. त्यांच्या मतें सोव्हिएट रशिया व चीन हेच देश शांतीचे खरे पाईक होत. या भूमिकेला विरोध करून कवि बा. भ. बोरकर यांनीं आपल्या मराठी भाषणांत, " शांति ही बाहेर न हुडकतां आपल्या अंतर्यामीं शोधिली पाहिजे ' हा मुद्दा मांडला. ' शांतीचे खरे दूत म्हणजे एक महात्माजीच. त्यांच्या पावलावर पावलें टाकून शांतीच्या खऱ्या प्रस्थापनेसाठीं किती लोक काय त्याग करायला तयार आहेत ? " हा खडा सवाल त्यांनीं टाकला. श्री. बोरकरांनंतर भदंत आनंद कौसल्यायन यांनीं शांतीबद्दल बौद्ध लेखकांची भूमिका समजावून सांगितली व शांतीकरितां युद्ध किंवा आक्रोश किती फोल आहे हें सांगितलें. देवेंद्र सत्यार्थी यांनीं, लेखकांचें युद्धकाळांतील व शांतिकाळांतील वेगळालीं कर्तव्यें सांगून पंजाबमधील एका लोकगीतांत शांतिप्रेम कसें व्यक्त झालें आहे, तें सांगितलें. श्री. आ. रा. देशपांडे ' अनिल ' यांनीं शांतीचें प्रतीक ' कपोत ' न कल्पितां, आंध्रवाङ्मयांतील कल्पित ' गंडोलाचा ' दाखला दिला. तो गंडोल मदोन्मत्त हत्तींना आपल्या पंजांत धरून उडूं शकतो. ' शांति म्हणजे निव्वळ युद्ध नको असा केवळ नकारात्मक प्रचार नाहीं ' हा त्यांच्या भाषणाचा मुख्य मुद्दा होता. युद्ध नसतांना जी अशांति माजते तिजवर उपाय साहित्यिकानें करायला हवा. अध्यक्षांच्या भाषणापूर्वीं जैनेंद्रकुमार यांनीं एक उत्कृष्ट








भाषण करून घृणा, तिरस्कार व द्वेष यांच्याविरुद्ध लेखक कसा लढत असतो व मानवी प्रेम व ऐक्य यांचा, अर्थात् अहिंसेचा तो कसा खरा प्रचारक असतो, हें आपल्या तत्त्वज्ञानमय भाषणांत स्पष्ट केलें.

या जवळजवळ चार तास चाललेल्या परिसंवादांतून ठळकपणें तीनचार मुद्दे श्रोत्यांसमोर उभे राहिले : ( १ ) सर्व भाषांतील साहित्यिकांना ' युद्ध की शांति' हा प्रश्न उद्विग्न करीत आहे, हें निश्चित. त्याचबरोबर ध्येयवादी, मानवतावादी, गांधीवादी, समाजवादी, साम्यवादी अशा सर्व साहित्यिकांचा कौल विश्वशांतीच्या बाजूनें आहे हेंहि निश्चित. ( २ ) पण शांततेच्या प्रस्थापनेविषयीं वापरल्या जाणाऱ्या साधनांबद्दल लेखकांमध्यें मतभेद आहेत. लेखक हा ठोकळेबाज प्रचारक असूं शकणार नाहीं हेंहि खरें. पण तो जगांतील हालचालींपासून दूर कोठें तरी लपून बसणारा स्वप्न-दर्शी गुहावासीहि नाहीं. ( ३ ) म्हणून या प्रश्नाच्या मूलभूत गोष्टींकडे लेखकांनीं लक्ष दिलें पाहिजे व व्यक्ति व्यक्ति, गट किंवा राष्ट्रें, जीं एकमेकांच्या नरडीचा घोट घेतांना दिसतात, त्यांच्यामागें जी शक्तिपूजा व पाशवी सांघिकता दिसून येते, तिच्या विरुद्ध साहित्यिकांना आपलें प्रेमाचें व करुणेचें अस्त्र पाजळावयाचें आहे.

दुसऱ्या दिवशीं कॉपीराइटबद्दल चर्चा फार उद्बोधक झाली. कॉपीराईट कायद्यांत अशी सुधारणा घडवून आणावी कीं, ज्या योगानें लेखकांच्या हक्कांची पायमल्ली होणार नाहीं व मुनाफाखोर प्रकाशकांकडून लोक नागवले व लुबाडले जाणार नाहींत, हा चर्चेचा निष्कर्ष होता. या दृष्टीनें वृंदावनलाल वर्मा यांनीं मूळ ठराव मांडला. यावर समर्थनपर भाषणें श्री. मैथिलीशरण गुप्त, डॉ. हरदेव बाहरी, श्री. 'अज्ञेय', 'दिनकर', 'अनिल', आनंद कौसल्यायन, जैनेंद्रकुमार यांनीं केलीं. भाषणांतून निरनिराळे सूरहि निघाले. विशेषतः ' अज्ञेय ' यांनीं लेखक हा निव्वळ मजूर नसून एक स्वतंत्र विचारवेत्ताहि आहे, या गोष्टीवर भर दिला. अनिलांनीं या प्रश्नाची कायद्याची बाजू मांडली व ' दिनकर 'नीं पाठ्यपुस्तकांतून लेखकांचे होणारे हाल व्यक्त केले. यानंतर परिचयसमारंभ होऊन एक सुंदर काव्यगोष्ठी झाली. यांत तेलुगु, मराठी, बंगाली, पंजाबी कवींनीं भाग घेतला. आणि हिंदीतर्फे सुमित्रानंदन पंत, ' दिनकर ', ' कोकिल ' इत्यादींनीं कविता म्हणून दाखविल्या. या कार्यक्रमाबरोबरच कांहीं वाङ्मयीन करमणुकीचेहि कार्यक्रम ठेवण्यांत आले होते.

तिसऱ्या दिवशीं सर्व निमंत्रित साहित्यिकमंडळी प्रयागजवळच ३४ मैलांवर कौशांबी येथें नव्या उत्खननांत सांपडलेले घोषितारामाचे नवे ब्राह्मी लिपींतील लेख आणि अवशेष बघावयास गेली. या लेखांमुळें खिस्तपूर्व सहाव्या शतकांतील इतिहासावर प्रकाश पडतो, असें संशोधकांचें म्हणणें आहे. आपल्या प्रांताचा ऐतिहासिक परंपरागत ठेवाहि या नव्याजुन्या साहित्यिकांना दाखविण्यांत महादेवींनीं औचित्य दाखविलें यांत शंका नाहीं. एकूण तीन दिवसांचा हा समारंभ मोठ्या खेळीमेळीनें व प्रेमानें पार पडला.

' साहित्यकारसंसद् ' या संस्थेच्या उद्देश्यपूर्तीत हे असले समारंभ बरेच उपयोगी ठरतील हें निःसंशय. पाहुण्यांच्या सरबराईत थोडी अव्यवस्था व प्रत्यक्ष अनुभवाच्या अभावीं कांहीं हेळसांड झाली असली, तरी मोठ्या ध्येयाकडे पाहतां ती क्षम्य मानावयास हवी. मराठी लेखकांचीं नांवें व पत्ते मजकडून देवीजींनीं मागितले होते. ही जबाबदारी अंशतः माझी होती. मी पंचवीसतीस नांवें त्यांना दिलीं होतीं. पण सर्वांना आमंत्रणें पोहोंचलीं किंवा नाहीं हें समजलें नाहीं. श्री. वि. स. खांडेकर व श्री. दादा धर्माधिकारी यांचे संदेश मात्र आले होते. यंदाचा उत्सव महादेवींना बऱ्याच घाईघाईत आटोपता घ्यावा लागला. पुढील वर्षीं प्रत्येक भाषेचे एक एक प्रातिनिधिक कवि, कवयित्री, कादंबरीकार, टीकाकार, नाटककार असे साहित्यिक बोलावून जास्त मोठे उत्सव करण्याची त्यांची मनीषा आहे. ' आंतरभारती 'च्या व ' विश्वभारती 'च्या स्वप्नांचें हें एक स्वरूपच नव्हे काय ?

महाराष्ट्रांतील लेखकांनीं या संस्थेच्या कार्यकलापांत जास्त अभिरुचि व्यक्त करावी, परस्पर सलोखा व स्नेहसंबंध वाढविण्यास साहाय्य करावें अशी ' संसदे 'च्या वतीनें मी विनंति करतों.

श्री. महादेवी वर्मा यांच्या साहित्यकार संसदेचा पत्ता—१ एलगिन रोड, अलाहाबाद—असा आहे.

---

# सारसंकलन

## साहित्यिकांना मार्गदर्शन

'हेरल्ड ट्रिब्यून' नें योजिलेल्या आंतरराष्ट्रीय लघुकथास्पर्धेंत बक्षिसाला योग्य ठरलेल्या गोष्टींच्या महाराष्ट्रीय व गुजराती लेखकांचा सत्कार करण्यासाठीं झालेल्या समारंभप्रसंगीं श्री. काकासाहेब कालेलकरांनीं कांहीं हृदयंगम विचार व्यक्त केले होते, ते गुजरातीवरून सारांशानें पुढें दिले आहेत:

"मी जेव्हां गुजरातेंत आलों तेव्हां ठक्करबाप्पांनीं मला असें विचारलें होतें कीं, तुम्ही महाराष्ट्रीय असून गुजरातेंत कसे आलांत? तेव्हां मी उत्तर दिलें, 'बडोद्याचा इतिहास वाचला तेव्हां कळलें कीं, मराठ्यांनीं गुजरातवर राज्य केलें, पण गुजरातचें प्रेम मराठ्यांना संपादितां आलें नाहीं. तेव्हां एक महाराष्ट्रीय म्हणून गुजरातची सेवा करावयास जाण्याचा व अशा तऱ्हेनें त्याचें प्रेम संपादन करावयाचा मी निर्णय घेतला आणि तो अमलांत आणला.' पण ज्या उद्देशानें मी गुजरातेंत राहिलों आणि ज्या समाधानानें महाराष्ट्रांत परत गेलों त्याचा विचार येऊन जेव्हां मी आज क्षुद्र बाबतींतील प्रांतीय मतभेदांमुळें आपल्यांत उत्पन्न होणारी उग्र वृत्ति पाहतों, तेव्हां आपल्यामधील कलह पाहून माझ्या हृदयाचे तुकडे तुकडे होतात! तुम्ही फक्त प्रांताच्या किंवा देशाच्या ऐक्याचीच गोष्ट सांगत न बसतां जगाच्या ऐक्याची भाषा बोलूं लागा. अशा क्षुल्लक मतभेदांच्या वेळीं एका मुलासाठीं दोन मातांमध्यें तक्रार उत्पन्न झाली असतां मुलाच्या खऱ्या आईनें जें केलें तशी वृत्ति ठेवावी... गुजरातीमध्यें साहित्याची सेवा करणाऱ्यांना 'साक्षर' म्हणतात. साक्षरांविषयीं संस्कृतांत असें सुभाषित आहे कीं, 'साक्षर' उलटले तर 'राक्षस' होतात! पण ही गोष्ट तुम्ही खोटी ठरवावी आणि सर्वांनीं देव बनावें......

"मला एकदां विचारण्यांत आलें कीं, 'तुम्ही ध्येयवाद मानतां कीं वास्तववाद?' मीं म्हटलें: 'मी दोन्ही मानतों.' हिंदुस्तानचें प्रतीक कमल आहे. देशाच्या भावनेचें तें द्योतक आहे. कमल चिखलांतून जन्मतें. पाण्यांतून तें बाहेर येतें आणि सूर्याभिमुख बनून त्याचें अखंड ध्यान धरून बसतें. त्याचप्रमाणें वास्तववादांतून आपलें जीवन उत्पन्न होतें आणि ध्येयवादाकडे आपणाला जावयाचें असतें. साहित्यहि जीवनांतूनच उद्भवतें. जीवन सत्य आहे आणि ध्येय ही सत्याची कृतार्थता (सिद्धि) आहे. साहित्य जीवनाच्या चिखलांतून प्रेरणा मिळवितें. पण त्याची कृतार्थता होते ध्येयाजवळ पोंचण्यांतच. आपण जर चिखलच हुंगीत बसलों, तर त्यांतून सार्थकता लाभणार नाहीं. सुगंध हुंगून कंटाळलेला माणूस दुर्गंधांतच आनंद मानूं लागला, तर आपण त्याला प्रतिष्ठा देणार नाहीं, तशीच त्याची निंदाहि करणार नाहीं. आपलें ध्येय सूर्याकडे जाण्याचें आहे. तेथें सुगंध नाहीं तसाच दुर्गंधहि नाहीं. फक्त कृतार्थता आहे.

"आजपर्यंत साहित्यकारांनीं व्यक्तिगत जीवनाचा विकास आलेखिला आहे. पण आतां आपण राष्ट्रीय जीवन, आंतरराष्ट्रीय जीवन आणि त्यांहूनहि पुढें जाऊन मानव्याचें जीवन हें साहित्यनिर्मितीचा विषय बनविलें पाहिजे. या जन्मीं नव्या विक्रमानें अंकित असें साहित्य पाहण्याची मला आशा आहे."

## डांगी प्रश्नाबाबत कांहीं विचार

वरच्या विचारांप्रमाणेंच दुसरे हृदयंगम विचार श्री. काकासाहेबांनीं मागें एका व्याख्यानप्रसंगीं काढले होते; ते "संस्कृति" मासिकाच्या फेब्रुवारीच्या अंकांतील त्या व्याख्यानाच्या अहवालांत आले आहेत. श्री. काकासाहेबांच्या खास लाक्षणिक शैलीचे ते द्योतक आहेत त्यांना डांगबद्दल

प्रश्न विचारण्यांत आला असतां त्याला त्यांनीं पुढील-प्रमाणें मार्मिक उत्तर दिलेलें आहे :

प्रश्न : " डांगबद्दल गुजरात—महाराष्ट्रांत खेंचा-खेंच चालली आहे. त्याविषयीं तुमचें काय मत आहे ? "

उत्तर : " डांगबद्दल या दोन प्रांतांना जें प्रेम आहे, त्याचें स्वरूप काय आहे ? डांगी लोकांची सेवा करण्याच्या भावनेचा तो उद्रेक आहे कीं जमीन मिळवण्याचा किंवा जाऊं न देण्याचा आग्रह आहे ? आज जे पांढरपेशे लोक डांगमध्यें राहात आहेत, ते सर्व भोळ्या डांगी लोकांच्या अज्ञानी व असहाय स्थितीचा गैरफायदा घेत आहेत; त्यांचें शोषण करीत आहेत. म्हणूनच मीं म्हटलें कीं, कोणी मला अथवा बकरीला विचारलें कीं, ' तिला वाघानें खाल्लेलें बरें कीं लांडग्यानें ? ' तर ती बकरी किंवा तिच्या वतीनें मी एवढेंच म्हणेन कीं, ' तिला कोणी खायचेंच काय म्हणून ? जगण्याचा तिला हक्क नाहीं का ? '...डांग अखंड राहिला पाहिजे असा निश्चय करून त्याबाबत डांगी लोकांचें मत विचारतां येईल !...पण माझें म्हणणें कोणी ऐकणार असेल, तर मी नवीनच उपाय योजीन. डांगमधील एकूणएक उत्पन्न डांगमध्येंच पंचवीस वर्षेंपर्यंत खर्चावयाचें, असें प्रथम नक्की करून डांगच्या प्रदेशाचे दोन्ही प्रांतांत लिलांव पुकारीन. जो प्रांत अधिक निःस्वार्थी सेवक व व अधिक पैसा आणून डांगमध्यें ओतण्याचा विडा उचलील आणि गॅरंटी देईल कीं, ' पंचाहत्तर टक्के डांगी लोकांना राष्ट्रभाषा-हिंदींत तरबेज बनवूं ' त्यालाच तो प्रदेश मिळेल, जो पिळवणूक ( exploitation ) करील तो प्रांत गमावून बसेल... गुजरात व महाराष्ट्र यांची भाषा, लिपि व संस्कृति जवळजवळ एकरूप आहे, त्यांत भांडणाला वावच असतां कामा नये. गुजराती व मराठी दोन्ही भाषा उत्तम जाणणाऱ्या सेवकांनाच डांगमध्यें काम करावयास पाठवावें. सरकारी नोकरींत डांगी लोकच असले पाहिजेत अथवा डांगी भाषेची सेवा करणारे असले पाहिजेत. "

या अनुसंधानांत फेब्रुवारीच्या ' अभिरुचि ' मासिकांतील श्री. ना. गो. कालेलकर यांचा लेख विचारप्रवर्तक म्हणून उल्लेखनीय आहे. त्यांनीं ' भाषांची क्षेत्रमर्यादा ' ठरवण्याबाबतची समस्या युरोपांतहि कशी उत्पन्न झालेली होती व संमिश्र स्वरूपाच्या बोली-भाषांचें क्षेत्र ठरविणें कसें अशक्य आहे, तें जगत्प्रसिद्ध फ्रेंच भाषाशास्त्रज्ञांच्या मतांसह सविस्तर मांडलें आहे. त्यांतील कांहीं उद्बोधक भाग पुढें दिला आहे.गुजरातच्या ' संस्कृति ' मासिकानें तो समग्र लेख अनुवादित केला आहे. प्रा. ना. गो. कालेलकर लिहितात :

" युरोपांतील भाषांसंबंधीं लिहितांना आंत्वान मेये या फ्रेंच भाषाशास्त्रज्ञांनीं केलेलें या विषयाचें विवेचन उद्बोधक होईल.पहिल्या जागतिक युद्धानंतर स्वयंनिर्णयाच्या तत्त्वानुसार युरोपांत जीं नवीं राष्ट्रें निर्माण झालीं त्यांपैकीं कांहींच्या सरहद्दी ठरवितांना हा प्रश्न उपस्थित झाला होता. अशा प्रकारच्या वादांत भाषाशास्त्रज्ञाची भूमिका काय असावी याविषयीं मेये म्हणतात :

' या किंवा त्या भाषेची क्षेत्रमर्यादा काय याविषयीं उपस्थित झालेले वाद निरर्थक होत. उपभाषांना नैसर्गिक मर्यादा नाहींत आणि केवळ प्रत्येक भाषिक वैशिष्ट्या (linguistic phenomenon)-च्या मर्यादाच निश्चित असूं शकतात हें कळलें म्हणजे या वादाची निरर्थकता पटते..... राजकारणापासून अलिप्त असणाऱ्या भाषाशास्त्रज्ञांना या बाबतींत कोणतेंहि मत देणें शक्य नाहीं... वस्तुतः या बोलींचा समावेश त्यांना स्वतः-जवळ ओढूं इच्छिणाऱ्या या संघांपैकीं कोणत्याहि एकांत निश्चितपणें होऊं शकत नाहीं आणि भाषिक पुरावा आहे याहून जरी अधिक स्पष्ट स्वरूपाचा असता, तरी अमुक एका संघाशीं असलेलें त्यांचें साम्य कोणत्याहि प्रकारें निर्णयात्मक ठरूं शकणार नाहीं. अशा प्रकारच्या क्षेत्रमर्यादा निश्चित करण्याच्या प्रश्नांत भाषाशास्त्राचा पुरावा देणें बालिशपणाचें आहे. मॅसेडोनिआचें भाषिक भवितव्य राजकारणावर अवलंबून आहे. स्पष्ट भाषिक मर्यादा हवी असेल, तर दोन भिन्न भाषांनीं दूर अंतरावर असणाऱ्या केंद्राहून पसरत जाऊन एकमेकींच्याजवळ येत-येत एकमेकींना स्पर्श करणें अशक्य आहे. असें झालें तर स्वित्झर्लंडमध्यें फ्रेंच, जर्मन व इटालियन किंवा बेल्जममध्यें फ्लेमिश








व फ्रेंच यांच्यामध्यें असणाऱ्या मर्यादांसारख्या मर्यादा आपणांला मिळतील. पण एकच सामान्य भाषा एकाद्या विस्तृत प्रदेशांत स्वाभाविक रीतीनें परिवर्तन पावल्यानें केवळ संक्रमक बोली निर्माण होतात. अशा परिस्थितींत उपभाषांच्या निश्चित मर्यादा अस्तित्वांत येणें शक्य नसतें. अमुक बोली ही कोणत्या उपभाषेची शाखा आहे हें ठरविणें हा भाषाशास्त्रांतील सर्वांत त्रासदायक प्रश्न आहे. निश्चित भाषासीमा ही अनपेक्षित ऐतिहासिक घटना किंवा विशिष्ट भौगोलिक परिस्थिति यांचा परिणाम होय. एकाद्या महान् संस्कृतीच्या दीर्घकालीन सहजीवनानेंच तिला राजकीय महत्त्व प्राप्त होऊं शकतें...'

"हिंदुस्थानांतील आर्यवंशीय भाषांच्या क्षेत्रमर्यादा ठरवितांना भेये यांचे वरील उद्गार लक्षांत ठेवणें इष्ट आहे. या भाषांचे उच्चार, व्याकरण आणि शब्दसंग्रह या सर्व दृष्टींनीं असणारें साम्य इतकें विलक्षण आहे, कीं हिंदीसारखी भाषा राष्ट्रीय जीवनासाठीं आत्मसात् करणें हा या भाषा बोलणारांच्या दृष्टीनें पोरखेळ आहे. अशा भाषासंघांत दोन समीपवर्ती भाषांमध्यें केवढें मोठें साम्य असेल हें सांगणें नको. गुजराती व मराठी या अशा प्रकारच्या भाषाभगिनी आहेत. त्यांच्या सीमाप्रदेशावर असलेली एकादी बोली या दोघींनाहि जवळची वाटली तर त्यांत नवल कसलें?

" डांगी ही अशा संक्रमक रूपांतील एक बोली आहे. शब्दांची किंवा प्रत्ययांची टक्केवारी काढून तिचें नातें अमुक भाषेपेक्षां अमक्कीशीं अधिक जवळचें आहे असा वाद घालणें निरर्थक आहे; आणि अमुक भाषेशीं अधिक साम्य असल्यामुळें तिच्या क्षेत्रांत या बोलीचा समावेश करावा असें मत भाषाशास्त्राचा आधार देऊन प्रकट करणें अयोग्य होय...

" मग या वादाचा निकाल लावायचा तरी कसा, असा प्रश्न साहजिकच निर्माण होतो. त्याला उत्तर हें कीं, हें राज्यकर्त्यांनीं ठरवावयाचें आहे. त्यांना जें सोयीचें वाटेल तें त्यांनीं करावें; पण असें करतांना भाषाशास्त्र आमच्या बाजूला आहे, असें म्हणण्याचा 'अव्यापारेषु व्यापार' करण्याची कांहीं जरूर नाहीं. भाषाशास्त्र भाषिक घटना घेऊन त्यांचा अभ्यास करतें. राजकीय पक्षांचा हस्तक म्हणून वापरलें जाण्यासाठीं त्याचा जन्म झालेला नाहीं. यांत भाषाशास्त्रदृष्ट्या आपणांला न्याय मिळाला असें समाधान महाराष्ट्रानें मानूं नये किंवा ही महाराष्ट्रीयांची दडपशाही आहे अशी व्यर्थ हाकाटी गुजरातनें करूं नये. दडपशाहीचें राजकारण चालविण्याइतकें राजकीय वर्चस्व आज महाराष्ट्राजवळ नाहीं ही गोष्ट स्पष्ट आहे. सरकारनें दिलेल्या संधीचा फायदा घेऊन उभय पक्षांनीं आपली भाषा व साहित्य डांगमध्यें लोकप्रिय करण्याचा प्रयत्न करावा. इतकें करून जर स्वत्वाची जाणीव निर्माण झालेल्या भविष्यकालीन डांगच्या लोकांना महाराष्ट्र किंवा गुजरात यांपैकीं कोणत्याहि प्रांतांत सामील होणें पसंत पडलें नाहीं, तर त्यांना स्वतंत्र प्रदेश म्हणून कबूल करणें न्यायाचें ठरेल."

## श्रीअरविंदांचा ' पूर्ण योग '

गेल्या आगस्टमध्यें अहमदाबादेस श्रीअरविंद-मंडळाच्या विद्यमानें श्रीअरविंदसप्ताह साजरा झाला. त्यावेळीं अनेक विद्वान् वक्त्यांचीं श्री अरविंदांविषयीं भाषणें झालीं. त्यांतील व्याख्यानांत प्रा. रा. ब. आठवले या संस्कृतच्या प्रसिद्ध अध्यापकांनीं श्रीअरविंदांच्या गीताविषयक निबंधाचा विचार इतर प्राचीन भाष्यकारांच्या तुलनेनें केला. हें प्रा. आठवले यांचें व्याख्यान अरविंदजयंतीच्या निमित्तानें झालें. यानंतर कांहीं महिन्यांनीं अरविंदांचें निर्याण झालें. गीताविषयक एका दृष्टिकोनाचा निदर्शक म्हणून त्या भाषणांतील महत्त्वाचा भाग 'मानसी' त्रैमासिकाच्या डिसेंबर १९५० च्या अंकावरून गुजरातींतून अनुवादून पुढें दिला आहे :

" कर्माच्या फलाबाबत आसक्ति ठेवूं नये ही गोष्ट टिळक व गांधीजी या दोघांना संमत आहे. पण नीतीच्या दृष्टीनें अयोग्य असें कर्महि कर्त्यानें शुद्ध बुद्धीनें लोकहितार्थ केलें, तर त्यांत पाप नाहीं असें टिळक मानतात. उलट गांधीजी नीतीवर इतका जोर देतात कीं, नीतीचे आदर्श पाळतां येत नसतील तर तें कर्म करूंच नये असें ते मानतात. गांधींनीं सर्वांत अधिक भर नीतीच्या सामान्य सिद्धांतावर, मग अनासक्तीवर आणि शेवटीं भक्तीवर दिलेला आहे. पण तो भक्तीवरील भरहि तितकासा स्पष्ट नाहीं.

"श्रीअरविंदांचें मत असें आहे कीं, नीतीचे जे आदर्श आहेत ते नीतिव्यवहार व त्यांचीं कार्यें







यापुरते योग्य होत. पण तें कांहीं अंतिम सत्य किंवा अंतिम स्थिति नव्हे. कारण नीतीचे सर्वोच्च आदर्शहि अखेरीस सत्त्वगुणात्मकच आहेत. सत्त्वगुणांत त्यांचा समावेश होतो. गीतेंत श्रीकृष्ण म्हणतात कीं, जो या अध्यात्ममार्गानें जाणारा असेल त्यानें त्रिगुणांच्या—सत्त्व, रजस्, तमस् या तिहींच्या–पलीकडे जावयाचें आहे. ' निस्त्रैगुण्यो भवार्जुन । ' सामान्य व्यावहारिक जीवनांत कोणीहि माणूस या तीन गुणांच्या पार जात नाहीं. तो मुक्त नसतो. अहिंसा, अस्तेय वगैरे गुण चांगले आहेत, उच्च आहेत याबद्दल दुमत नाहीं; पण शेवटीं हे गुणहि सत्त्वगुणाचेच अंगभूत आहेत, त्याचेच अंश आहेत ! परमार्थाच्या साधनेंत या सत्त्वगुणाला फार महत्त्वाचें स्थान नाहीं. एकादें लोकहिताचें काम करण्यांत हिंसेचा किंवा अशाच इतर गोष्टींचा आश्रय करावा लागत असला, तर तें लोकहित साधण्यासाठीं अहिंसा, सत्य वगैरे आदर्शांचा भंग झाला तरी तें कर्म करावें. ' अहिंसा हाच माझा धर्म आहे, किंवा सत्य हाच ईश्वर आहे ' असें गीतेचें मत नाहीं. गीता या आदर्शांना सत्त्वगुणाचे समजून त्यांच्या पलीकडे जावयास सांगते. गांधीजींचे आदर्श किंवा आजच्या युगांतील शांततावाद्यांचे आदर्श हे नीतीचे आदर्श होत. त्यांच्या पुढें ते जाऊं शकत नाहींत, तसेंच हे आदर्श माणसाला फार पुढें घेऊन जात नाहींत. नीतीच्या या आदर्शांत शक्तीच नसते.

" गीतेंत अहिंसा नाहीं असें नाहीं. पण तीच सर्वश्रेष्ठ आहे असें मानलेलें नाहीं. तर मग गांधीजींनीं अहिंसा हीच सर्वश्रेष्ठ असें कशावरून म्हटलें असावें ? त्याचें कारण असें कीं, ते स्वतः वकील होते व उत्तम प्रचारक होते. तेव्हां आपल्या मताच्या समर्थनार्थ त्यांनीं गीतेचा उत्तम उपयोग केला. गांधीजींनीं हा एक सुंदर पण निराधार युक्तिवाद शोधून काढला आहे कीं, महाभारतांतें युद्ध हें मानवाच्या अंतरंगांत असलेल्या विकारांविरुद्ध आत्म्याचें युद्ध आहे. असें जर असेल, तर अशा ' युद्धां 'त ' युद्ध ' करणाऱ्याला ' पापा 'ची भीति वाटण्याची गोष्ट कशी येते ( ' नैवं पापमवाप्स्यसि ' । ) ? काम, क्रोध, असत्य वगैरे विकार यांच्या विरुद्ध माणूस लढला तर तेथें पाप कोणतें कीं, ज्यामुळें गीतेला ' युध्यस्व विगतज्वरः ' असें म्हणण्याचा प्रसंग यावा ? याचें उत्तर गांधीजींजवळ नाहीं. ते तेथें चूप बसून राहतात. याचें खरें कारण असें कीं, ते आदर्श नीति मानणारे राजकारणी पुरुष व राजकारणी प्रचारक होते, तत्त्वज्ञानी नव्हते; आणि म्हणूनच एवढ्या मोठ्या माणसाकडून अशी गंभीर चूक झाली.

" श्रीअरविंदांच्या ' पूर्णयोगां 'त गीतेंतील या रहस्याचा समावेश झालेला आहे; त्याप्रमाणेंच श्रीवल्लभाचार्यांच्या भाष्यांतील भक्तीचा महिमा आणि तंत्रमार्गांतील जगाच्या सत्यत्वाचा सिद्धान्त या गोष्टीहि त्यांनीं स्वीकारल्या आहेत, व त्या तिहींचा सुंदर समन्वय साधलेला आहे. हें जग म्हणजे एकादी मिथ्या वस्तु नाहीं कीं मायाहि नाहीं; तीं भगवंताची एक अकल्पनीय, अनादि कालापासून चालत आलेली लीला आहे. आपण सर्व माणसें इतर प्राणी, जड व चेतन सर्व कांहीं त्याचेच अंश आहोंत. आपण वासुदेवाचेच अंश आहोंत, सर्व कांहीं वासुदेवच आहे, भगवंतच आहे. भगवंताचाच हा सर्व आविर्भाव आहे. ज्ञान, कर्म आणि भक्ति मिळून होणारा त्रिविध योग आवश्यक मानूनहि श्रीअरविंदांनीं भक्तीला सर्वोच्च स्थान दिलेलें आहे.

" श्री अरविंद पुढें म्हणतात कीं, ' गीता जेथें थांबते, जेथें गीतेचें ज्ञान व योग पुरे होतात, तेथून पुढें माझा मार्ग, माझा योग सुरू होतो.' अशा प्रकारें ते पुढें पावलें टाकीत आहेत, पुढें पुढें जात आहेत व इतर साधकांना आपणांबरोबर नेत आहेत. "

### वामनवटूंच्या प्रदेशांत

आपल्या पुराणांत अंगुष्ठमात्र वालखिल्यांची कथा आहे. तसेंच वामनवटूंचा उल्लेखहि पुराणांत आढळतो. पारिस्तानांतील अद्भुत कथांतून लिंगदेह धारण करणाऱ्या दैवी योनींचीं वर्णनें आहेत. परंतु प्रत्यक्ष या पृथ्वीवर अशा ठेंगूजींची वसाहत आहे, असें सांगितल्यास आश्चर्यच वाटेल. ' सायन्स



अनुक्रमणिका






डायजेस्ट 'च्या डिसेंबर १९५० च्या अंकांत जॅक् ग्रीन यांचा एक लेख सारांशरूपानें दिलेला आहे. त्यांत अशा एका जमातीचें वर्णन आहे. तें फार मनोरंजक वाटण्यासारखें आहे.

ठेंगूजी ( Pigmies )च्या वसाहती जगांत कित्येक ठिकाणीं आढळतात. उदा. पॅसिफिक द्वीपसमूहांत. पण सर्वांत मोठी जमात आफ्रिकेच्या मध्यप्रदेशांत, विषुववृत्तप्रदेशीय पश्चिम आफ्रिकेंत, ॲबिसीनियाच्या दक्षिणेस आहे.

१९४६ च्या उन्हाळ्यांत एम्. नोएल. बॅलिफ ( M. Noel Ballif ) यांच्या नेतृत्वाखालीं एक फ्रेंच संशोधक-तुकडी त्या प्रदेशांत गेली. तोंपर्यंत तेथें गोऱ्या लोकांचा प्रवेश झालेला नव्हता. त्यांनीं दोन महिने तेथें मुक्काम केला. बरोबर कॅमेरे, रेकॉर्ड घेणारे, भूगर्भशास्त्रज्ञ, पुराणवस्तुसंशोधक, चित्रकार आणि अर्थातच मानववंशशास्त्रज्ञहि होतेच. प्रथम एक नीग्रो दुभाष्या त्यांनीं मिळवला. आणि नीग्रो जमातीच्या मुख्यानें बाबिंगांच्या शिकारभूमीकडे त्यांना घेऊन जायचें कबूल केलें. नीग्रो लोक या ' पिग्मी ' ठेंगूजींना ' बाबिंगा ' नांवानें ओळखतात.

पिग्मी ठेंगूजी शिकारी आहेत. पुरुषांचा सर्व वेळ शिकारींत आणि हत्यारें व जाळीं तयार करण्यांत जातो. बायका झोंपड्या बांधतात, रांधतात. ने-आण करतात आणि शिकारींत पुरुषांबरोबर असतात. त्यांना जमीन कसायची परवानगी नसते.

शेतीला हे ठेंगूजी कमी दर्जाचा धंदा मानतात. ' कोम्बा ' (Comba) देवानें आपणाला जंगलांत शिकारीला पाठविलें आहे व आम्ही शेती करावी अशी त्यांची इच्छा नाहीं, असें ते मानतात.

फक्त मोसमांत जेव्हां नीग्रो लोकांजवळ व्यापार करायचा असतो तेव्हां सुऱ्या, तंबाखू आणि बंदुकीची दारू विकत घ्यायला पुरेसे हस्तिदंत, चामडीं, मांस व रबर नसेल, तरच ते बायकांना नीग्रो-बरोबर कापणी करूं देतात; पण तें केवळ मोबदल्या पुरतेंच.

ही जमात भटकी आहे. कांहीं आठवड्यांनंतर एके ठिकाणीं राहात नाहीं. ते मुख्यत मांस खाऊन-राहतात. गॅझेल, रानडुकर, गोरिला, हत्ती यांची ते शिकार करतात. पिठासाठीं ते मॅनिओक ( manioc ) नांवाचें रानटी धान्य नीग्रोजवळून घेतात. त्यांना कंद, फळें व एका तऱ्हेचे मोठे सुरवंट आवडतात. सुरवंट गोळा करण्याचें काम मुख्यतः मुलेंच करतात.

शिकारीचा समारंभ सर्वांत मुख्य होय. ९० भक्कम बांधणीचीं माणसें शिकारीला तयार होतात. नाच सुरू होतो व कांहीं मोठीं मुलें वगळून तान्ह्या मुलांसह सर्व शिकारीच्या जागेकडे जातात. त्यांचा मुख्य शिकारीची जागा ठरवतो.

जंगलांतील एका मोठ्या रानाभोंवतीं जाळीं लाव-तात. एका बाजूचा कांहीं भाग मोकळा असतो. जाळीं लावतांना संपूर्ण स्तब्धता असते. फांदीचा सपसप आवाज होत नाहीं, कीं मुलें रडत नाहींत. हें काम पुरें झालें कीं मुख्य नायक निशाणी देतो व सर्व लोक रान उठवूं लागतात. जाळींत आलेल्या जनावराला प्रथम जो मारील त्याला मानाचा हक्क असतो. मुलेंसुद्धां त्यासाठीं चढाओढ करतात.

ही संशोधक मंडळी तेथें असतां, हत्तीची शिकार झाली नाहीं, पण गोरिलाची झाली. एका नीग्रोनें तीन गोळ्यांनीं एका गोरिलाला जखमी केलें, पण तो गोरिला त्याचा पाठलाग करूं लागला. बंदुकीच्या बारांचा आवाज ऐकून एक ठेंगूजी तिकडे धांवला व आपल्या जुनाट बंदुकीचा बार, नेम न धरतांच, त्यानें काढला व टोंकाला बसवलेलें पातें गोरिलाच्या आतड्यांत घुसलें. त्यावेळीं त्या वसाहतींत फार आनंदोत्सव झाला, कारण गोरिलाचें मांस डुकराच्या मांसासारखेंच लागतें.

पिग्मी—ठेंगूजी आपापसांत लढत नाहींत, किंवा नीग्रो शेजाऱ्यांशींही लढत नाहींत. त्यांना एकाद्या वेळेस दोन विरोधी नीग्रो टोळ्यांचे पंच म्हणूनहि नेमतात. ते समूहवृत्तीनें राहतात; मात्र प्रत्येक कुटुंबाचें अन्न बायकोच तयार करते. त्यांच्यांत एक-पत्नीत्व आहे.

पिग्मी—ठेंगूजींचें जीवन प्रारंभिक अवस्थेचें आहे. त्यांना सूत काढायचें चक्र माहीत नाहीं कीं गाडीचें चाक माहीत नाहीं. वेलींच्या तंतूंपासून ते








आळीं बनवितात. त्यांची वस्त्रें म्हणजे कंबरेला गुंडाळलेलीं पानें किंवा वल्कलें होत.

अग्नीचें रक्षण ते डोळ्यांत तेल घालून करतात. त्यांना विस्तव पाहिजे असल्यास कापलेले केस एका निमुळत्या भांड्यांत ठेवून तीक्ष्ण टोंकांच्या काठीनें ते मागेंपुढें घाशीत बसतात.

त्यांना बाहेरच्या जगाबद्दल कांहींहि जिज्ञासा नाहीं. विजेचे दिवे, आगपेट्या, लायटर्स, आणि फोटोग्राफीचीं यंत्रें पाहून त्यांना फार गंमत वाटली आणि त्यांच्याच गायनाच्या रेकॉर्ड्स् ऐकून त्यांना भयंकर हंसूं लोटलें. पण त्यांनीं या नवीन ' दिव्य ' वस्तूंची कधीं मागणी केली नाहीं. त्यांना त्यांचे पाहुणे फार उमद्या स्वभावाचे वाटले. तरी पण ते थोडेसे वेडपट-( crazy )-च वाटले असावेत !

## सम्राट् दारिअसूचा विजयलेख

खिस्तपूर्व ५२२ मध्यें म्हणजे जवळजवळ २,५०० वर्षांपूर्वी प्राचीन इराणचा सम्राट् दारिअस् सिंहासनाधिष्ठित झाला सिंहासनावर हक्क सांगायला इतर नऊजण होते. भयंकर लढायांत त्यांचा पराभव करून त्यानें गादी मिळविली आणि आपली विजय-गाथा ४००० फूट उंचीच्या पर्वतराजींवरील एका उभ्या उंच कड्याच्या पाठीवर खोदून ठेवली. आणि तेथेंच आपलें स्वतःचें आणि नऊ पराजित शत्रूंचीं चित्रेंहि त्या भक्कम दगडाच्या भिंतींत कोरवून ठेवलीं. दारिअस्नें पश्चिमेकडे मुसंडी मारून ग्रीसपर्यंतचा सर्व भूभाग पादाक्रांत केला. पण ग्रीकांनीं थर्मापिलीच्या जगत्प्रसिद्ध खिंडींत त्याला यशस्वी रीतीनें तोंड दिलें. त्यामुळें त्याला ग्रीस देश जिंकतां आला नाहीं. दारिअसूच्या या कोरीव लेखांची माहिती पुढें तेथील लोकहि विसरले. भाषा नष्ट झाली आणि फक्त ते " नऊ दरवेशी " तेवढे लोकांच्या माहितींत राहिले.

त्या कोरीव लेखांचें महत्त्व प्राचीन भाषांच्या दृष्टीनें फार आहे. दारिअसनें आपली विजयकथा तीन भाषांत कोरून ठेवलेली आहे: ( १ ) प्राचीन पर्शिअन् ( २ ) बाबिलोनियन आणि ( ३ ) एलमाइट् ( Elamite ). एलमाइट् ही भाषा त्या काळीं ' शूश ' किंवा ' सुसा ' या ठिकाणचे (बायबलमधील 'पॅलेस' चे) लोक बोलत. या भाषांची लिपि शंकूच्या आकाराच्या अक्षरांची आहे व गेल्या शतकापर्यंत त्या भाषांची कांहींच माहिती संशोधकांना नव्हती. या दृष्टीनें ह्या शिलालेखाचें महत्त्व अपूर्व आहे. म्हणूनच १९४८ सालीं मिचिगन युनिव्हर्सिटी-तील पौरस्त्यविद्याशाखेचे अध्यक्ष प्रा. जॉर्ज जी. कॅमेरॉन यांनीं या शिलालेखांचे आणि दारि-असूच्या मुखवट्याचे ठसे घेऊन त्यांचें संपूर्ण वाचन करावयाचा सर्वोच्च प्रयत्न केला. त्या सर्व प्रयत्नांचें वर्णन ' नॅशनल जिऑग्रफिक् ' मासिकाच्या डिसेंबर १९५० च्या अंकांत सचित्र आलेलें आहे. तें सर्वच वर्णन मोठें उद्बोधक आणि मनोरंजक आहे.

या शिलालेखांचें महत्त्व भारताच्या संस्कृतीच्या दृष्टीनेंहि आहेच. ही प्राचीन पर्शियन भाषा अवेस्ताहून अलीकडची आहे. साधारणपणें ' अवेस्ता ' ही वैदिक भाषेशीं समकालीन होती आणि ही ' प्राचीन पर्शिअन ' भाषा बौद्धकालीन पाली वगैरे भाषांची समकालीन होती. अवेस्ताचें व वैदिक भाषेचें नातें किती जवळचें आहे, तें तज्ज्ञांना ठाऊकच आहे. ' अवेस्ता ' तील मुख्य देव ' अहुरमझ्द ' यालाच आपल्याकडे ' असुर ' देव बनविला. वैदिक रूपकांचें स्पष्टीकरण करणारे कांहीं पंडित वैदिक ' वृत्रासुर ' आणि हा ' अहुरमझ्द ' यांचें नातें जुळवितात. यावरून या बलाढ्य ' असुर ' संस्कृतीशीं वैदिक संस्कृतीचा संघर्ष चांगलाच जोरांत होऊन वैदिक लोकांना पूर्वेकडे हटावें लागलें असें दिसतें. दारिअस् ह्यानें हल्ला केलेले ग्रीक लोक आणि आपले वैदिक पूर्वज हे सर्वच आर्यकुलोत्पन्न शाखां-तील लोकच होते. ' अवेस्ता ' भाषेंतील संज्ञांचे संकेत व अर्थ पुढें झोरोॲस्टरनें बदलले.

' नॅशनल जिऑग्राफिक मॅगेझिन ' मधील उपरिनिर्दिष्ट लेखांत प्रा. कॅमेरॉन म्हणतात.

" हल्लींच्या कर्मानशाह विभागांत बिसितुन-जवळ एक पर्वत आहे. तेथून प्राचीन काळीं एक उंटांच्या तांड्यां ( caravan ) चा रस्ता जात असे; कारण तेथेंच पाण्याचे झरे आहेत. या झऱ्यांच्या वर ३४० फूट उंचीवर आणि माणसाला पर्वतावर जेवढें चढणें शक्य आहे तेथून १०० फूट उंच, तुटलेल्या कड्याच्या पृष्ठभागावर दारिअसूची



अनुक्रमणिका






पूर्ण आकाराची कोरीव मूर्ति उभी आहे. त्याच्या डोक्यावर सम्राटाचा मुकुट आहे. त्याच्या मागें दोन अधिकारी नोकर त्याचा भाला व धनुष्यबाण धरून उभे आहेत. त्याच्यापुढें आकाशांत देवाधिदेव किंवा 'ज्ञान–देव' (' wise lord ') 'अहुर-मझ्द' पंखावर तरंगत आहे. या दैवतमूर्तीच्या खालीं (सिंहासनाचे) आठ प्रतिनिधी आहेत. त्यांच्या माना दोरीनें एकत्र बांधलेल्या आहेत; हात मागें बांधलेले आहेत. नववा राजा दारिअसचा सर्वांत मुख्य शत्रु होता; तो दारिअस्च्या डाव्या पायापुढें लोटांगण घालीत आहे असें दाखविलें आहे. नंतरचा दहावा शत्रु कांहीं वर्षांनीं मागाहून कोरलेला आहे. या सर्व कोरीव चित्रांच्या खालीं व वर आतांच उल्लेखिलेले तीन भाषांतील विजयलेख कोरलेले आहेत.

"या शिलालेखांची आधुनिक साधनांच्या साह्यानें मुळाबरहुकूम नक्कल करणें अवश्य होतें. व तें काम माझ्यावर (प्रो. कॅमेरानवर) आलें. जेथें आज जाणेंहि अशक्यप्राय झालेलें आहे तेथें इतक्या उंचीवर शिलालेख व मूर्ति खोदण्याचें प्रचंड काम दारिअसच्या कारागिरांनीं कसें केलें असेल, हा आमच्यापुढें विस्मयकारक प्रश्न होता. पण लवकरच दारिअसचे लोक तेथें कसे जात असतील याचा उलगडा आम्हांला झाला. आम्ही ब्रिटिश ऑइल कंपनीच्या खात्यामार्फत लोखंडी दोरखंड वरून सोडून त्याला लोंबता पाळणा बांधला. उंच शिडीच्या साहाय्यानें आम्ही प्रथम त्या खडकाच्या रुंद पट्टीपाशीं जात असूं व तेथून पाळण्यांतून अधांतरीं तरंगत वर जात असूं. शेवटच्या दिवशीं त्या खडकाळ पट्टीवरून पुढें जाऊन आम्ही शोध घेतला असतां शेवटीं कांहीं झिजलेल्या पायऱ्या दिसल्या व तेथून पुढचा भाग एकदम छिनून टाकलेला आढळला. दारिअस्च्या कारागिरांनींच हा मार्ग उखडून टाकला असला पाहिजे.

"आम्ही बरेच दिवस उन्हांतान्हांतून व पाऊसवाऱ्यांतून काम केलें आणि आमचे चारी उद्देश तडीस नेले: अजूनपर्यंत नकलून न झालेला चार रकाने लेख नकलला, तिन्ही लेखांच्या मागील संशोधकांनीं केलेल्या नकलांशीं प्रत्यक्ष शिलालेखांतील मजकूर ताडून पाहून चुका सुधारल्या; मूर्तींचीं छायाचित्रें घेतलीं, तपासणी केली आणि त्या संबंध खोदकामाचा ठसा तयार केला. त्यामुळें दारिअस्च्या कारागिरांची येथें जाण्याची रीत आम्हांला उमगली.

"मूर्तींचें शिल्प फारच चांगलें व काळजीपूर्वक केलेलें आहे. हाताच्या बोटांचीं नखें, दाढी-मिशा, कंकणें, धनुष्यें, पादत्राणेंसुद्धां चतुरपणें उठाव देऊन कोरलेलीं आहेत. सम्राटाला स्वाभाविक असलेल्या तुच्छतेनें दारिअस् आपल्या पराजित शत्रूकडे पाहात आहे आणि आपला प्रमुख वैरी गौमत याला पायाखालीं नमवीत आहे. सम्राटाची दाढी म्हणजे एक स्वतंत्र दगडी भाग आहे व तो शिशानें घट्ट बसविलेल्या दोन लोखंडी खुंट्यांनीं तेथें जडवून टाकलेला आहे.

अशा या भव्य कृतीचा निरोप घ्यावयाचा दिवस आला. माझा हात शिलालेखावरील एका भागावर होता. तो भाग असा:

'सम्राट् दारिअस असें सांगत आहे कीं, जर हा लेख तुम्ही गुप्त न ठेवतां लोकांना त्याचें ज्ञान करून दिलेंत, तर मग अहुरमज्द तुमचा मित्र बनेल, तुम्हांला मोठ्या कुटुंबाचें सौख्य लाभेल आणि तुम्ही दीर्घायुषी व्हाल.'

तो मोठा गंभीर क्षण होता."

---

अब्राहम लिंकन एकदा म्हणाले होते कीं, एकादें राष्ट्र अर्धें परतंत्र आणि अर्धें स्वतंत्र असें असणें शक्यच नाहीं. हे त्यांचे उद्गार आज केवळ प्रत्येक राष्ट्राच्या बाबतींतच खरे आहेत असें नव्हे, तर सबंध जगालाच लागू आहेत.

—प्रो. एच्. जे. मुलर (सुप्रसिद्ध जीवशास्त्रज्ञ), मुंबई, २८–३–५१










अनुक्रमणिका






Regd. No. B. 5177






